# आशियाई क्रीडास्पर्धा

लेखक

प्रभाकर शं. गोखले




महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ

# निवेदन

यंदा नवव्या आशियाई क्रीडास्पर्धा नवी दिल्ली येथे होत आहेत. त्या निमित्ताने श्री. प्रभाकर शं. गोखले यांनी हे छोटे परिचयात्मक पुस्तक लिहिले आहे. ते अत्यंत वेळेवर प्रसिद्ध करण्यास मंडळास आनंद होत आहे.

विजयादशमी शके १९०४
ता. २७ ऑक्टोबर, १९८२

**सुरेंद्र बारलिंगे**
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई

## अनुक्रमणिका



* * *

## इंडियन ऑलंपिक हॉकी टीम
## बर्लिन ऑलेंपियाडचे विजेते १९३६



**मागची ओळ :**

सी. जे. मिकी ( रेल्वेज ), अहसन खान (भोपाळ), सी. जी. कलन (मद्रास), एम. एन. मसूद ( मानवदार ), गुरुचरणसिंग ( पंजाब ), ल इमेट ( बेंगॉल ), बी. एन. निमल (बॉंबे), ए. आय. दारा (आर्मी), एस.एम.हुसेन (मानवदार).

**मधली ओळ :**

रूपसिंग (यू.पी.), सी.सी.टॅपसेल (बेंगॉल), पंकज गुप्ता,असि.मॅनेजर (बेंगॉल), ध्यानचंद, कॅप्टन ( आर्मी ), प्रोफेसर जगन्नाथ, मॅनेजर ( पंजाब ), आर. जे. ॲलान, व्हाइस कॅप्टन ( बेंगॉल ), एस. एम. जाफर ( पंजाब ).

**पुढची ओळ :**

जे. फिलिप्स ( बॉंबे ), शहाबुद्दीन ( मानवदार ), जे. गॅलिबार्डी ( बेंगॉल ) पी. फर्नांडीस ( सिंध ), अहमद शेर ( भोपाळ ).

**एफ. आर. लॉफर**

हॉफफोटोग्राफ फ्रॅंकफुर्ट.




१९३६ च्या बर्लिन येथील ऑलेंपिक स्पर्धांत पुरुषांच्या हॉकीमध्ये अजिंक्य ठरलेल्या भारताच्या संघातील प्रत्येक खेळाडूस " डिप्लोमा " म्हणजे प्रशस्तिपत्र देण्यात आले. चित्र श्री. बाबूराव तिमल यांना मिळालेल्या प्रशस्तिपत्राचे.

# पंडितजी आणि आशियाई खेळ

" स्नेहपूर्ण वातावरणात राष्ट्राच्या युवकांचा विकास करण्याच्या दृष्टीने मैदानी खेळांच्या स्पर्धा उत्तमच होत. आपल्याला तर त्या विशेष महत्त्वाच्या आहेत. कारण, या राष्ट्रीय आणि सामाजिक कार्याच्या विशिष्ट अंगाकडे आपण फारच दुर्लक्ष केलेले आहे. साऱ्या राष्ट्राच्या व विशेषतः तरुण पिढीच्या शारीरिक तंदुरुस्तीकडे लक्ष देणे हे आपले साध्य असले पाहिजे. लक्ष्य उंचावरचे धरले आणि त्या दृष्टीने स्पर्धा नियोजित केल्या तरच अशी शारीरिक तंदुरुस्ती प्राप्त होऊ शकेल. हे साध्य सर्वदा दृष्टीपुढे ठेवले पाहिजे.

" खेळाडूंच्या या आंतरराष्ट्रीय संमेलनांना आणखी एक महत्त्वाचे अंग आहे. अनेक राष्ट्रांतील तरुणांना या स्पर्धा एकत्र आणतात. त्यामुळे त्या आंतरराष्ट्रीय स्नेहास आणि सहकार्यास प्रोत्साहन देतात. सध्या संघर्षाचे काळेकुट्ट ढग आपल्या शिरावर फिरत आहेत. अशा वेळी तर अशी राष्ट्राराष्ट्रांत सामंजस्य आणि सहकार्य वाढविणारी प्रत्येक संधी आपण हाती धरली पाहिजे."

( भारताचे पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू यांनी नवी दिल्ली येथे १९५१ च्या मार्चमध्ये भरलेल्या पहिल्या आशियाई क्रीडास्पर्धेसाठी दिलेल्या संदेशातील उपरोक्त उतारा आहे. )

# आशियाई स्पर्धांच्या निमित्ताने



१९८२च्या हिवाळ्यामध्ये नववे आशियाई सामने व क्रीडास्पर्धा भारताच्या राजधानीत भरविल्या जाणार असल्याचे कळताच साऱ्या भारतभर एक काहीसा आगळा उत्साह पसरला. खेळ, क्रीडा, स्पर्धा या केव्हाही उत्साहजनकच, पण जगातील जवळ जवळ निम्म्या लोकसंख्येतील, विविध राष्ट्रांतील उत्तमोत्तम असे पाच हजार स्त्री-पुरुष युवक आशियाई स्पर्धांत भाग घेणार असल्याने त्याबद्दलचा उत्साहही स्वाभाविकपणेच आगळा असणार. शिवाय, या स्पर्धांसाठी होणारी मैदानांची, क्रीडासाहित्याची सारी व्यवस्था आधुनिक भारतास, तंत्रज्ञानातील त्याच्या दर्जास, शोभेशी होणार असल्याने तर या नवव्या आशियाई क्रीडास्पर्धांकडे साऱ्या भारताचे लक्ष लागून राहणे स्वाभाविकच होय.

या स्पर्धांमुळे केवळ आशियात, सध्या सर्वांत वेगाने कोण पळतो, सर्वाधिक उंच उडी कोण मारतो, इतकेच पाहण्याची संधी भारतीयांना मिळणार नसून अशा प्रकारच्या भव्य स्पर्धा संघटित करण्याचे कौशल्य आणि त्यासाठी लागणारी शास्त्रीय व तंत्रविषयक प्रगती भारताने गेल्या तीस वर्षांत किती साधली आहे हे भारतीयांना व साऱ्या जगासही दिसून येणार आहे.

## सामन्यांकडून अपेक्षा

या नवव्या आशियाई क्रीडास्पर्धा भारतात घडवून आणल्याने जागतिक क्रीडाक्षेत्रात भारताला स्थान प्राप्त करून देणाऱ्या प्रवर्तकांनी साठ वर्षांपूर्वी पाहिलेल्या एका संकल्पचित्राचे रूप साकार होण्यातील हे दुसरे पाऊल पडत आहे. १९२०मध्ये प्रथमच भारताचे खेळाडू, जागतिक ऑलिंपिक स्पर्धेमध्ये धाडण्यात आले. त्यासंबंधाने आपले विचार व्यक्त करताना त्या वेळच्या ऑलिंपिक मंडळाचे प्रमुख कार्यकर्ते भविष्याबद्दल काही सांगून गेले. ते म्हणाले, " युरोपातील सार्वराष्ट्रीय शर्यतींना केव्हा तरी एकदा हिंदुस्थानतर्फे आमंत्रण देऊन १९२८चे अगर १९३२चे सामने हिंदुस्थानात यशस्वी रीतीने पार पाडून दाखवून त्यातील कार्यक्रमांपैकी निदान काही बाबतींत तरी हिंदी वीरांना

पहिला मान पटकावता आल्याखेरीज भारतीय ऑलिंपिक मंडळाच्या कार्याची पूर्तता होणार नाही. ”

भारताने पहिले आशियाई सामने १९५१मध्ये म्हणजे भारतीय ऑलिंपिक मंडळाच्या स्थापनेनंतर ३१ वर्षांनी दिल्ली येथे भरवले. आता त्यानंतर ३१ वर्षांनी भारत पुन्हा एकदा आशियाई सामने भरवत आहे. पहिल्या आशियाई सामन्यांपेक्षा ते फारच मोठ्या आणि अत्यंत आधुनिक पद्धतीने भरविले जाणारे सामने आहेत. ऑलिंपिक स्पर्धा भारतात भरविण्याच्या दृष्टीने हे एक पुढे पडलेले महत्त्वाचे पाऊल ठरू शकेल. या नवव्या आशियाई क्रीडास्पर्धांसाठी क्रीडांगणांची व तदनुषंगिक सिद्धता कसकशी केली गेली हे पुढे येईलच. परंतु भारतीय ऑलिंपिक मंडळाच्या प्रवर्तकांनी साठ वर्षांपूर्वी व्यक्त केलेली ‘ हिंदी वीरांच्या ’ पराक्रमाबद्दलची अपेक्षा या स्पर्धांत पुरी होणार की नाही? तसेच एकूण क्रीडास्पर्धा व राष्ट्राचा विकास या संबंधात पंडित जवाहरलाल नेहरू यांनी ३१ वर्षांपूर्वी व्यक्त केलेली अपेक्षा पुरी करण्याच्या दृष्टीने भारतात काही कार्य चालू आहे की नाही? या दोन्ही प्रश्नांची उत्तरे या आशियाई क्रीडास्पर्धांच्या निमित्ताने काळजीपूर्वक व वस्तुनिष्ठ दृष्टीने हुडकली जावी. तूर्त तरी असे दिसते की, उपरोक्त दोन्ही प्रश्नांची उत्तरे नकारार्थी असण्याचीच शक्यता आहे. तसे झाले तरी निराश होण्याचे कारण नाही. पण या प्रश्नांची उत्तरे यानंतरच्या दहा-वीस वर्षांनी तरी हमखासपणे होकारार्थी मिळतीलच अशा प्रकारे कार्यरत होण्याची स्फूर्ती आशियाई क्रीडास्पर्धांपासून भारताच्या युवकांनी, क्रीडा-संघटकांनी आणि एकूण समाजाने व म्हणून सरकारने घेतली तरी या नवव्या आशियाई क्रीडास्पर्धांसाठी केलेला खर्च व घेतलेले कष्ट सार्थकी लागले असे होऊ शकेल.

प्रयत्नांची उपरोक्त दिशा काहीशी स्पष्ट व्हावी यासाठी विचारांना चालना मिळावी या दृष्टीने या आशियाई क्रीडास्पर्धांकडे बघण्याचा हा एक प्रयत्न आहे.

* * *

# जगाच्या अंगणात भारत



पाच हजार खेळाडू सहभागी होत असलेल्या क्रीडास्पर्धा भरविण्याची जबाबदारी आज भारताने घेतली असता एकूण आंतरराष्ट्रीय क्रीडाक्षेत्रात भारत समाविष्ट झाल्यापासून त्याने काय प्रयत्न केले व काय साधले याकडे दृष्टिक्षेप टाकणे मार्गदर्शक ठरू शकेल. असे सिंहावलोकन करण्यास पुणे हेच सर्वोत्तम ठिकाण आहे असे म्हटल्यास वावगे होणार नाही. भारतीय ऑलिंपिक मंडळाची म्हणजे इंडियन ऑलिंपिक असोसिएशनची स्थापना पुण्यात डेक्कन जिमखान्यावर १९२०च्या प्रारंभी झाली. ती हकीगत केवळ मौजेचीच नव्हे तर ह्या कार्यामागील विचारांच्या प्रेरणेची माहिती देणारी ठरू शकेल.

पुण्यातील डेक्कन जिमखाना ही एक त्या काळातील अत्यंत प्रगत अशी क्रीडासंस्था असे. १९१० सालापासून या जिमखान्यातर्फे शालेय विद्यार्थ्यांच्या कुस्त्या होत असत. १९१३पासून या स्पर्धांत आट्यापाट्या, खोखो, रस्सीखेच, वनसंचार ( क्रॉस कंट्री ) वगैरे खेळांचा समावेश करण्यात आला. १९१५ पासून सत्तावीस मैल पळण्याची म्हणजे मॅरेथॉन स्पर्धा हिचा समावेश या सामन्यांत करण्यात आला. १९१८मध्ये ‘ पायगाड्यांची शर्यत ’ म्हणजे सायकलिंग या त्या वेळच्या अगदी आधुनिक क्रीडाप्रकाराचा या स्पर्धेत समावेश झाला आणि पुणे, मुंबई, सातारा, कोल्हापूर, नासिक, बडोदा, इंदूर वगैरे ठिकाणच्या मिळून २०० उमेदवारांनी यात भाग घेतला. मॅरेथॉन स्पर्धा चालू करून डेक्कन जिमखान्याने तत्कालीन ऑलिंपिक स्पर्धांतील एका बाबीस हात घातलाच होता. त्यांनी १९२०च्या नोव्हेंबरमध्ये ऑलिंपिक नियमानुसार कुस्त्यांचे सामने घडविले. अशा प्रकारे डेक्कन जिमखाना ही संस्था हळूहळू क्रीडास्पर्धांचा अधिक व्यापक दृष्टीने विचार करू लागली होती. त्याचे एक कारण त्या संस्थेच्या सभासदांची व्यापक दृष्टी आणि सुशिक्षितपणातही असू शकेल. १९२०मध्ये डेक्कन जिमखान्याच्या अध्यक्षपदी सर दोराब जे. टाटा हे मुंबईचे गृहस्थ होते. सर दोराबजी हे आधुनिक औद्योगिक युगाशी आणि तदनुषंगिक संस्कृतीशी परिचित होते. जिमखान्याच्या उपाध्यक्षपदी मुंबईचे डॉ. मोरेश्वर गोपाळ देशमुख यांच्याशिवाय पुण्याचे श्री. नरसिंह चिंतामण केळकर यांच्यासारखे अखिल भारतीय दर्जाचे राजकीय नेते व

विद्वान, रसिक साहित्यिक आणि श्री. एल. बी. फाटक हे एक यशस्वी ठेकेदार आणि मिस्टर ओ. एच. टी. डडले हे ब्रिटिश गृहस्थ होते. त्या वेळीच स्वातंत्र्य चळवळीत हिरीरीने भाग घेणारे श्री. हरी विठ्ठल तुळपुळे हे डेक्कन जिमखान्याचे खजिनदार होते, तर एक उत्कृष्ट अभियंता, शिक्षक व कारभारी म्हणून सुप्रसिद्ध असलेले प्रा. शंकर रामचंद्र भागवत हे चिटणीस आणि सुविख्यात गणितज्ञ प्रोफेसर त्र्यंबक भिकाजी हर्डीकर हे 'मदत चिटणीस'. ह्या मंडळींच्या बरोबर त्यांच्या त्यांच्या व्यवसायक्षेत्रातील, साधनाक्षेत्रातील मंडळी डेक्कन जिमखान्याच्या कार्यात सहभागी असत. त्यामुळे ह्या कार्यास व्यापक दृष्टी आणि राष्ट्रीय प्रवृत्तीची जोड असे. याचे एक लक्षण म्हणजे डेक्कन जिमखान्याने पुढाकार घेऊन स्थापन केलेले 'मध्यवर्ती क्रीडामंडळ'. जिल्ह्या-जिल्ह्यांतून पद्धतशीर काम करणाऱ्या क्रीडासंघटना उभाराव्या व त्यांची संयुक्त संस्था म्हणून या मंडळाने काम करावे अशी त्यामागील कल्पना होती. हे काम डेक्कन जिमखान्याने १९२०च्या पूर्वी केले. असेच काम करणारी पण अधिक व्यापक अशी अखिल महाराष्ट्र शारीरिक शिक्षण परिषद १९२८मध्ये पुण्यात झाली, आणि पहिली अखिल भारतीय शारीरिक शिक्षण परिषद होण्यास त्यानंतर एकवीस वर्षे जावी लागली. यावरून डेक्कन जिमखान्यातील ह्या व्यक्तींचे कार्य किती दूरदृष्टीचे होते याचा पडताळा येतो.

या दूरदृष्टीतूनच डेक्कन जिमखान्याने भारतीय ऑलिंपिक मंडळ (इंडियन ऑलिंपिक असोसिएशन) स्थापन करण्यात पुढाकार घेतला. त्यासंबंधीची हकीगत डेक्कन जिमखान्याच्या संबंधित वृत्तान्तातून वाचणे मोठे उद्‌बोधक ठरते. 'डेक्कन जिमखाना, पुणे' या संस्थेच्या १९२२च्या संक्षिप्त वृत्तान्तात त्याच्या आठव्या कलमात पुढील उल्लेख आहे:—

"(८) भारतीय ऑलिंपिक मंडळ.

"या सार्वराष्ट्रीय महोत्सवात (जागतिक ऑलिंपिक स्पर्धेत) हिंदी खेळाडूंना बरोबरीच्या नात्याने सामील होता यावे एतदर्थ, तसेच ऑलिंपिक कमिटीवर हिंदींच्या वतीने प्रतिनिधी निवडून देण्याचा हक्क संपादन करण्यासाठी 'भारतीय ऑलिंपिक मंडळ' (इंडियन ऑलिंपिक असोसिएशन) नावाची एक संस्था स्थापन करण्याचे ठरवून, १९२०च्या प्रारंभी सर दोराब टाटा यांच्या अध्यक्षतेखाली डेक्कन जिमखान्याने या महत्त्वाच्या कार्यास स्वयंस्फूर्तीने हात घातला. संस्था स्थापन झाल्यापासून अवघ्या चार महिन्यांच्या कालावधीत हिंदुस्थानभर तिच्या एकंदर सतरा शाखा उघडण्यात आल्या, व संस्थेचा कार्यपसारा इतक्या झपाट्याने फैलावत गेला की, अल्पावधीत संस्थेच्या सभासदांची संख्या दहा हजारापर्यंत पोहोचली. मुंबई इलाख्याचे गव्हर्नर यांची मदत व व्हाईसरॉय यांची सहानुभूती यामुळे लवकरच संस्थेची गाऱ्हाणी विलायत सरकारच्या कानापर्यंत जाऊन पोहोचली; व हिंदुस्थानचे तत्कालीन स्टेट सेक्रेटरी मिस्टर मॉंटेग्यू यांनी योग्य चौकशीअंती "हिंदी राष्ट्राला सार्वराष्ट्रीय ऑलिंपिक

कमिटीवर प्रतिनिधित्व मिळेल" असे इंडियन ऑलिंपिक असोसिएशनच्या सेक्रेटरींना मार्च १९२०च्या प्रारंभी तारेने कळविले. बेल्जमच्या ऑलिंपिक कमिटीकडूनही "हिंदुस्थानच्या खेळाडूंस ऑलिंपिक सामन्यांतून भाग घेता येईल" अशा आशयाची पाठोपाठ तार आली. अशा रीतीने अवघ्या चार महिन्यांत कार्यसिद्धी झाल्याबरोबर जुलै १९२०मध्ये अँटवर्प शहरी भरणाऱ्या सार्वराष्ट्रीय शर्यतींमध्ये निवडक हिंदी वीरांना युरोपात पाठवून त्यांच्या कर्तबगारीचे प्रदर्शन सर्व जगापुढे मांडण्याचे योजून एप्रिल १९२० अखेर डेक्कन जिमखान्याने आपल्या मैदानावर सिलेक्शन कमिटीवरील तज्ज्ञांच्या देखरेखीखाली निवडक उमेदवारांसाठी पुन्हा मर्दुमकीचे सामने भरवून मेसर्स चौगुले, कैकाडी, शिंदे, बॅनर्जी, नवले व दातार या सहा उमेदवारांची अखेर निवड केली, व सर दोराब टाटा यांच्या मदतीने त्यांची बेल्जियमला रवानगी केली. दुर्दैवाने बेल्जमच्या क्रीडांगणावर या हिंदी खेळाडूंना यावे तसे यश आले नाही हे खरे, तथापि त्यातल्या त्यात चौगुले व शिंदे यांनी थोडीबहुत बाजू सावरली. रा. रा. शिंदे, हे कुस्त्यांच्या उपान्त्य फेरीपर्यंत चीत झाले नाहीत. रा. रा. चौगुले हे बेल्जियमच्या क्रीडांगणावरील २७ मैलांच्या शर्यतीत जरी १९वे आले तरी इंग्लंडात दहा मैली शर्यतीतून त्यांनी चांगला नावलौकिक मिळविला. तथापि जगातील सर्व निवडक, तरबेज, चलाख, तडफदार प्रतिस्पर्ध्यांबरोबर शर्यतीला उभे राहणे म्हणजे काही थट्टा नव्हे. या अनुभवातच भावी यशाचे बीज आहे, कारण आमचे चुकते कोठे हे समजल्याखेरीज जगात पहिला मान मिळविणे फार दुरापास्त आहे. १९२४ साली पॅरिसमध्ये भरणाऱ्या सार्वराष्ट्रीय शर्यतीसाठी उमेदवार निवडण्याच्या कामी भारत ऑलिंपिक मंडळाला १९२०च्या टीमचा हा अनुभव मार्गदर्शक होईल यात शंका नाही. युरोपातील सार्वराष्ट्रीय शर्यतींना केव्हातरी एकदा हिंदुस्थानतर्फे आमंत्रण देऊन १९२८चे अगर १९३२चे सामने यशस्वी रीतीने पार पाडून दाखवून यांतील कार्यक्रमांपैकी निदान काही बाबतींत तरी हिंदी वीरांना पहिला मान पटकावता आल्याखेरीज भारत ऑलिंपिक मंडळाच्या कार्याची पूर्तता होणार नाही."

या वृत्तान्तात पुढे असेही नमूद आहे की भारत ऑलिंपिक मंडळाचे प्रतिनिधी म्हणून सर दोराब टाटा "या बाबतीत हिंदुस्थानच्या हितसंबंधाचे रक्षण" नीट पार पाडत आहेत, आणि "डेक्कन जिमखाना आपल्या परीने कार्य करीत आहे." पण "अंती यश येणे न येणे लोकाश्रयावर अवलंबून" आहे.

## ऑलिंपिकसाठी भारताचे खेळाडू

यानंतर १९२४ सालच्या ऑलिंपिकसाठी भारताचा संघ निवडण्याची चाचणी स्पर्धा आंतरप्रांतीय स्पर्धांच्या रूपाने दिल्ली येथे झाली, आणि आठ सदस्यांचा एक संघ पॅरिस येथील ऑलिंपिक स्पर्धेसाठी धाडण्यात आला. तेव्हापासून भारत सातत्याने जागतिक ऑलिंपिक स्पर्धेत कमी-अधिक, प्रमाणात भाग घेतच आला. १९५२ साली हेलसिंकी

येथे झालेल्या ऑलिंपिक स्पर्धेपासून भारताच्या संघात महिला खेळाडूंचा समावेश होऊ लागला.

भारताच्या ऑलिंपिक स्पर्धांतील चमूंतील खेळाडूंची संख्या क्रमशः वाढतच गेली, हे पुढील आकड्यांवरून दिसते :– ऑलिंपिकचे वर्ष – १९२४, भारताचे खेळाडू ८, १९२८–२३, १९३२–२०, १९३६–२४, १९४८–७६, १९५२–६८, १९५६–५६, १९६०–५६, १९६४–५३, १९६८–२३, १९७२–४६, आणि १९८०–२६. खेळाडूंची संख्या मुख्यतः वाढली ती ज्या वर्षी फुटबॉलच्या संघाचाही समावेश होता त्या वर्षीच.

ऑलिंपिकमधील भारताच्या खेळाडूंची संख्या जरी वाढत गेली तरी त्यांचा पराक्रम मात्र म्हणण्याजोगा झाला नाही. किंबहुना, त्या बाबतीत भारतीय ऑलिंपिक मंडळाच्या संस्थापकांची निराशाच व्हावी असेच एकूण घडत गेले.

नॉर्मन डी. पिच्छार्ड हे एक अँग्लो-इंडियन गृहस्थ १९०० सालच्या ऑलिंपिक स्पर्धेत २०० मीटर्स धावण्याच्या व २०० मीटर्स अडथळ्याच्या ( हर्डल्स ) शर्यतीत दुसरे आले होते. १९२८ मध्ये भारताने प्रथमच हॉकीचे सुवर्णपदक जिंकले. पण त्या वेळच्या संघात बहुधा युरोपीय व अँग्लो-इंडियन खेळाडूच होते. त्यांची संख्या पुढे कमी कमी होत गेली. भारताने १९३२मध्ये व १९३६मध्येही हॉकीचे सुवर्णपदक जिंकले. त्यांपैकी १९३६च्या बर्लिन येथील ऑलिंपिक स्पर्धेतील भारतीय हॉकी संघ विशेष गाजला, तो एक तर, त्याच्या अभेद्य संघवृत्तीमुळे आणि ध्यानचंद यांच्या असामान्य वैयक्तिक कौशल्यामुळे. या संघाचा पराक्रम केवळ गोल्सच्या संख्येने तर विलक्षण ठरलाच, पण त्याहीपेक्षा त्यातील खेळाडूंचे चेंडूवर ताबा ठेवण्याचे आणि त्यासह हुलकावण्या देऊन प्रगती करण्याचे कौशल्य लोकोत्तर असल्याने परिणामी "हॉकी खेळण्याचा अधिकार ईश्वराने फक्त भारतीयांनाच मात्र दिला आहे," अशासारखे उद्गार त्या वेळी निघू लागले. हॉकीचा हा पांढरा चेंडू नामक गोल भारतीयांना पाहताच न्यूटनचे वास्तुशास्त्राचे नियमही धाब्यावर बसवतो, अशा प्रकारची भारतीय हॉकीपटूंची स्तुती केली जाऊ लागली. दुसऱ्या महायुद्धानंतर १९४८ मध्ये लंडन येथे भारताने आपला ऑलिंपिक हॉकीमधील मक्ता चालूच ठेवला. १९५२ मध्येही हॉकीचे सुवर्णपदक भारतीयांनीच मिळविले. १९५६ मध्ये मेलबोर्न येथील ऑलिंपिक सामन्यांत प्रथमच पाकिस्तान व भारत या हॉकी क्षेत्रातील सहोदरांची प्रतिस्पर्धी म्हणून गाठ पडली. अंतिम सामन्यात पाकिस्तानवर केवळ एकाच गोलने ( १–० ) विजय मिळवून भारताने सुवर्ण-पदक आपल्याकडे राखले. त्यानंतरच्या म्हणजे १९६०च्या ऑलिंपिक सामन्यांत मात्र भारताचा पाकिस्तानकडून एका गोलने ( ०–१ ) पराभव होऊन पदक पाकिस्तानकडे गेले. ते १९६४च्या टोकिओ येथील ऑलिंपिक स्पर्धेत भारताने परत मिळविले. त्यानंतर मात्र भारताचे हॉकीतील यश सर्वस्वी अनिश्चित होऊन बसले. १९८०च्या मॉस्को येथील ऑलिंपिक सामन्यांत जरी भारताने हॉकीचे सुवर्णपदक मिळविले तरी

तेवढयावरून त्याचे यश मोजता येणार नाही; कारण त्या सामन्यांत पाकिस्तानने भाग घेतला नव्हता व त्यानंतरच्या अनेक आंतरराष्ट्रीय स्पर्धांत भारताचा खेळ म्हणण्याजोगा किंबहुना एके काळच्या ' हॉकीच्या सम्राटास ' शोभेसा झालेला नाही.

अनेक ऑलिंपिक स्पर्धांतील भारतीय हॉकी संघाचे यश वगळता बाकी ऑलिंपिक स्पर्धेत भारतास मिळालेले यश हे पोत्यांनी नव्हे, पिशव्यांनी नव्हे तर निठव्यानेही मोजण्याजोगे नाही. १९५२च्या हेलसिंकी ऑलिंपिकमध्ये खाशाबा जाधव यांना कुस्तीत कांस्य ( ब्रॉंझ ) पदक मिळाले. १९५६च्या मेलबोर्न येथील सामन्यांत भारताचा फुटबॉल संघ अंत्य फेरीत प्रवेश करता झाला. पण नंतर बल्गेरियाकडून त्याचा पराभव झाल्याने त्याचा चौथा क्रमांक लागला. १९६०मध्ये रोम येथील ऑलिंपिक स्पर्धेत मिल्खासिंग हे चारशे मीटर्स धावण्याच्या स्पर्धेत सहावे आले. १९६४च्या टोकिओ येथील ऑलिंपिक स्पर्धेत गुरुबचनसिंग हे ११० मीटर्स हर्डल्समध्ये पाचवे आले. असे, अगदी एकाच हाताच्या बोटावर मोजता यावेत इतकेच ऑलिंपिक यशाचे प्रसंग भारतास आले.

भारत हा लोकसंख्येच्या दृष्टीने जगातील दुसऱ्या क्रमांकाचा देश आहे. एवढया प्रचंड लोकसंख्येमधून जागतिक क्रीडामंचावर पराक्रम गाजवू शकतील असे मूठभरच का होईना पण वीर सातत्याने का निर्माण होऊ नयेत हा खरा एक चिंतेचा विषय ठरावा. पण या प्रश्नाचा विचार करण्यापूर्वी जागतिक नाही तर निदान आशियाई स्पर्धेत तरी भारताने आपल्या आकारास शोभेसा काही पराक्रम केला होता की नाही हेही पाहणे वाजवी ठरावे. आशियाई क्रीडास्पर्धा चालू करण्यात भारतानेच पुढाकार घेतला हे लक्षात घेता तर अशी पाहणी विशेष महत्त्वाची ठरावी.

* * *

# आशियाई क्रीडास्पर्धा



आशियाई क्रीडास्पर्धा चालू करण्यात भारतातील ज्या व्यक्तींनी विशेष पुढाकार घेतला त्यांत प्रा. जी. डी. सोंधि हे अग्रगण्य होते. खरे तर प्रा. सोंधि यांनी आपले सारे जीवनच भारतात ऑलिंपिक चळवळीचा प्रचार करून तिला समर्थ बनविण्यात व्यतीत केले. ते अनेक वर्षे भारत ऑलिंपिक मंडळाचे पदाधिकारी तर होतेच, पण १९३२ ते १९६६ या काळामध्ये ते आंतरराष्ट्रीय ऑलिंपिक कमिटीचे भारतातील सदस्य होते, आणि १९६१ ते १९६५ या चार वर्षी ते आंतरराष्ट्रीय ऑलिंपिक कमिटीच्या कार्यकारिणीचे सदस्यही होते.

सार्वराष्ट्रीय ऑलिंपिक सामन्यांच्या धर्तीवर आशियाई देशांचे वेगळे सामने घडवावे असा विचार प्रा. सोंधि यांच्या मनात बऱ्याच वर्षांपासून होता. १९३४मध्ये प्रा. सोंधि यांनी पुढाकार घेऊन पश्चिम आशियाई सामने दिल्ली येथे भरविले. या सामन्यांत हिंदुस्थान, अफगाणिस्थान, सिलोन आणि पॅलेस्टाईन या चार राष्ट्रांनी भाग घेतला होता. सामन्यांत फक्त ॲथलेटिक्स, हॉकी आणि तैराकी ( जलतरण ) याच क्रीडाप्रकारांचा समावेश होता. ॲथलेटिक्समध्ये भारताने तेरा सुवर्ण पदके, नऊ रौप्य पदके आणि पाच कांस्य पदके मिळविली. पॅलेस्टाईनने तीन रौप्य व सहा कांस्य तर अफगाणिस्थानने एक रौप्य व तीन कांस्य पदके मिळविली. तैराकीत भारतास सहा सुवर्ण, चार रौप्य व तीन कांस्य पदके मिळाली तर पॅलेस्टाईनला दोन रौप्य व एक कांस्य पदक मिळाले. हॉकीमध्ये भारत विजयी व अफगाणिस्थान उपविजयी ठरला. दुसरी पश्चिम आशियाई स्पर्धा १९३८ मध्ये तेल अवीव येथे व्हावी असे ठरले होते. परंतु, त्यापूर्वीच इटालीने अबिसीनियावर स्वारी केल्याने व युरोपवर व म्हणून जगावरच महायुद्धाचे ढग वावरू लागल्याने या स्पर्धा प्रथम लांबणीवर टाकून अखेर रद्द कराव्या लागल्या.

१९१३ पासून ते जवळ जवळ दुसऱ्या महायुद्धाच्या प्रारंभापर्यंत आशियाच्या दुसऱ्या टोकास 'फार ईस्टर्न चँपियनशीप' या नावाची स्पर्धा होत असे. परंतु त्यात केवळ फिलिपिन्स, चीन आणि जपान ही तीनच राष्ट्रे सहभागी असत.

जपान, चीन आणि फिलिपिन्स ही त्या वेळची तुलनेने प्रगत, स्वतंत्र आशियाई

राष्ट्रे आपल्या वेगळ्या स्पर्धा करत, हे लक्षात घेता त्या वेळच्या आशियातील इतर देशांना क्रीडास्पर्धेत पुढे पाऊल टाकण्यास ती स्वतंत्र होईतो वाव मिळणे कठीण असावे असे वाटते. ते बरोबर असावे. याचा पुरावा म्हणजे आशियाई क्रीडास्पर्धा खरोखर प्रगत होत गेल्या त्या भारत, पाकिस्तान, ब्रह्मदेश, लंका प्रभृती अनेक आशियाई देश राजकीय दृष्ट्या स्वतंत्र होऊन विकसित होत गेले तशतशाच.

पुन्हा एकदा प्रा. सोंधि यांच्या पुढाकारानेच, पण स्वतंत्र भारताच्या सरकारी पाठिंब्याने व विशेषतः तत्कालीन आरोग्यमंत्री राजकुमारी अमृत कौर यांच्या प्रोत्साहनाने, पहिल्या आशियाई क्रीडास्पर्धा १९५१मध्ये भारताच्या राजधानीत भरवल्या गेल्या. त्या अकरा दिवस चालू होत्या. भारताचे पहिले राष्ट्रपती डॉ. राजेंद्रप्रसाद यांनी त्यांचे उद्‌घाटन केले. या स्पर्धेत एकूण अकरा देश सहभागी झाले होते. उद्‌घाटनाच्या समारंभात अकारविल्हे करून बिनीस अफगाणिस्थानचा संघ व त्या मागोमाग ब्रह्मदेश, सिलोन, इंडोनेशिया, इराण, जपान, मलाया, फिलिपिन्स, सिंगापूर, थायलंड यांचे संघ शिस्तबद्ध मिरवणुकीने क्रीडांगणावर आले. ऑलिंपिक स्पर्धांच्या चालीरीतीनुसार यजमान राष्ट्राचा म्हणजे भारताचा संघ सर्वांत शेवटी क्रीडांगणात दाखल झाला. या पहिल्या आशियाई क्रीडास्पर्धांत ॲथलेटिक्स, बास्केटबॉल, सायकल दौड, फुटबॉल, तैराकी ( जलतरण ) आणि भारोत्तोलन ( वेट लिफ्टिंग ) या सहाच खेळांचा समावेश होता. तरी एकूण स्पर्धकांची संख्या ४८९ एवढी होती.

हे पहिलेच आधुनिक आशियाई सामने असल्याने त्याबरोबरच आशियाई क्रीडाजगतात परंपरेची स्थापना होणे स्वाभाविकच होते. "अधिक वेगाने, अधिक उंच, अधिक सशक्त" हे या खेळाचे ब्रीद ठरले. हे ब्रीद सार्वराष्ट्रीय ऑलिंपिक स्पर्धेच्या ब्रीदाशी मिळतेजुळतेच होते. जणू काही ऑलिंपिक स्पर्धा व या नवजात आशियाई स्पर्धा यांचे मायलेकीचे नातेच दाखविण्यासाठी की काय या पहिल्या आशियाई सामन्यांत क्रीडाज्योत प्रज्वलित केली गेली ती १९२४च्या ऑलिंपिक स्पर्धेत भाग घेतलेल्या ब्रिगेडियर दलिपसिंग या खेळाडूच्या हस्ते. दुसरे व त्यानंतरचे आशियाई सामने कोठे झाले, त्यात किती क्रीडाप्रकारांचा समावेश होता, किती राष्ट्रे व खेळाडू यांनी भाग घेतला होता वगैरे माहिती पुढे आणि अखेरीस दिलेल्या कोष्टकात आहेच.

आता नववे आशियाई सामने नव्या दिल्लीतच होत आहेत. पहिले सामने दिल्लीत झाले त्याला आता ३१ वर्षे होऊन गेली. दरम्यानच्या काळात या सामन्यांचा दर्जा सुधारला त्याप्रमाणेच या सामन्यांच्या व्यवस्थेचा, त्यासाठी वापरल्या जाणाऱ्या उपकरणांचा दर्जाही सुधारला व तो सतत अधिकाधिक आधुनिक होत राहिला. आता नववे आशियाई सामने भारताच्या राजधानीत ज्या क्रीडांगणावर होणार आहेत ती क्रीडांगणे, त्यावर वापरली जाणारी उपकरणे, मोजमापाची साधने वगैरेंची आधुनिकता केवळ आशियाई क्रीडास्पर्धांच्या विकासाचीच नव्हे तर यजमान राष्ट्राच्या विकासाचीही ग्वाही देणारी ठरावी.

* * *

# नववी आशियाई क्रीडास्पर्धा



भारताची राजधानी आता दुसऱ्यांदा आशियाई क्रीडास्पर्धा भरवीत आहे. १९५१ साली या स्पर्धेचा उपक्रम झाला, तो नॅशनल स्टेडियमवर. हे क्रीडांगण मुंबईच्या पटेल स्टेडियमइतपत वा कलकत्त्याच्या ईडन गार्डन इतपतही सुसज्ज नव्हते. स्वातंत्र्यानंतर लगेचच चार वर्षांतच भारत अद्ययावत सुसज्ज क्रीडाव्यवस्था करू शकेल असे मानणे अवास्तव, अव्यवहार्य ठरले असते. पण तरीही आशियाई क्रीडास्पर्धांसारख्या आंतरराष्ट्रीय क्रीडास्पर्धा सुरू करण्यात यजमान राष्ट्र म्हणून भारताने पुढाकार घेतला ते भारताच्या क्रीडाप्रेमाच्याच नव्हे तर त्याच्या व्यापक आंतरराष्ट्रीय, सर्वक्षेत्रव्यापी दृष्टीचे प्रतीक होय. स्वातंत्र्योत्तर आशियाई राष्ट्रांचा विकास व्हावयाचा तो सर्वांगीण व्हावा व परस्पर सहकार्याने व्हावा या भारताच्या स्वातंत्र्य चळवळीपासूनच्या भूमिकेचा प्रत्यय १९४७ पासून अनेक प्रकारे येत राहिला आहे. पहिली आशियाई क्रीडास्पर्धा भारताने आपल्या राजधानीत भरविली हाही त्या भूमिकेचा आणखी एक आविष्कार होय.

भारताचा या भूमिकेतून होत असलेला विकास आणि त्या भूमिकेचा, त्यामागील विचाराचा विकास हा ३१ वर्षांनी भरवीत असलेल्या आशियाई क्रीडास्पर्धेतून प्रकट व्हावा हे स्वाभाविकच होय. तसा तो होतही आहे. एकंदर सहभागी होणाऱ्या राष्ट्रांची संख्या ३१ झाली आहे, किंबहुना सोव्हिएट यूनियनचा आशियातील भाग आणि काही थोडी प्रस्तुत सशस्त्र संघर्षग्रस्त असलेली राष्ट्रे सोडून बाकी सारी आशियाई राष्ट्रे नवव्या आशियाई क्रीडास्पर्धांत सहभागी आहेत. त्याचबरोबर या स्पर्धांसाठी वापरली जाणारी क्रीडांगणे, क्रीडामहाल व उपकरणे ही भारताच्या वैज्ञानिक आणि आर्थिक प्रगतीची प्रतीके ठरावीत अशी आहेत.

या नवव्या आशियाई स्पर्धांमधील महत्त्वाच्या खेळांमधील ॲथलेटिक्स व फुटबॉल यांचे सामने आणि क्रीडास्पर्धेचा उद्घाटन समारंभ व समारोप हे दोन्हीही भव्य समारंभ नेहरू स्टेडियमवर होणार आहेत. या स्पर्धेचे ते मुख्य स्टेडियम होय. ते या स्पर्धेच्या निमित्ताने नव्याने बांधलेले आहे. ते नवी दिल्ली येथे लोदी रोड या भागात आहे. त्याच्या प्रेक्षागृहात ७५ हजार प्रेक्षक बसू शकतात. क्रीडांगणाच्या मधोमध फुटबॉलची व्यवस्था

असून त्याभोवती आठ गाळ्यांचा धावण्याच्या स्पर्धेचा मार्ग आहे. या मार्गाबाहेर उंच उडी, लांब उडी वगैरे उड्या आणि विविध फेकीच्या स्पर्धा होतील. मुख्य म्हणजे नेहरू स्टेडियमवरील धावपट्टी ही केवळ दाबलेल्या मातीची वा दगडी कोळशाच्या राखेची नसून ती कृत्रिम रसायनाची ( सिंथेटिक ) आहे. वर्षाच्या कोणत्याही ऋतूत म्हणजेच कोणत्याही हवामानात खेळाडूंना सारखीच मदत करणारी अशी मुद्दाम बनविलेली कृत्रिम रासायनिक धावपट्टी सध्या जगातील सर्व चांगल्या क्रीडास्पर्धांसाठी वापरली जाते. नव्या दिल्लीत नेहरू स्टेडियमवर नवव्या आशियाई क्रीडास्पर्धांच्या निमित्ताने बसविली जाणारी ही कृत्रिम रासायनिक धावपट्टी भारतातील या प्रकारची पहिलीच धावपट्टी होय.

याच ठिकाणी अन्यही अनेक आधुनिक सोयी केल्या जात आहेत. उदाहरणार्थ चालू असलेल्या खेळांचे निकाल प्रेक्षकांना अगदी सहज दिसावेत यासाठी जवळ जवळ १५० फूट उंचावर २३ मीटर लांब व ९ मीटर उंच असे गुणफलक बसवले गेले आहेत. हे गुणफलक कोणत्याही स्पर्धेचा निकाल त्यातील खेळाडूंची नावे, राष्ट्राचे नाव, मोजमापे, वेळ वगैरे सर्व माहिती ती ती स्पर्धा संपताच जवळ जवळ तत्काल प्रदर्शित करतील. ही चपळाई त्या गुणफलकांना त्याच्या मागील व्यवस्थेमुळे येणार आहे. ही व्यवस्था कॉम्प्युटर या आधुनिक यंत्रामुळेच शक्य होणार आहे. हे गुणफलक जरी हंगेरीतून आले असले तरी ते वापरण्याचे आवश्यक ते तंत्रज्ञान व सहयोग–उपकरणे भारतात आज उपलब्ध असल्यानेच ही व्यवस्था शक्य झाली.

या क्रीडांगणावर क्रीडास्पर्धा दिवसा तसेच रात्री होतील. त्यासाठी सर्व क्रीडांगणावर सूर्यप्रकाशासारखा समप्रकाश रात्रीही पाडण्याची व्यवस्था करण्यात आली आहे. प्रेक्षागाराच्या चार कोपऱ्यांत खूप उंच मीनार उभे करून त्यावरून क्रीडांगणावर प्रचंड प्रकाशझोत टाकले जाणार आहेत. हे मीनार उभारणे सोपे नव्हते. कारण ते उभारत असताना जवळच्या ( सफदरजंग ) विमानतळाच्या कामात अडथळा येणार नाही याची काळजी घेणे आवश्यक होते. त्यासाठी हे मीनार एखाद्या जिन्याप्रमाणे तिरके असून ते मुख्य प्रेक्षागृहाच्या मागून क्रीडांगणावर प्रकाशझोत टाकतील. नेहरू स्टेडियम-वरील नवव्या आशियाई क्रीडास्पर्धेतील कालमापन हेही आधुनिक इलेक्ट्रॉनिक उप-करणांच्या साहाय्याने अचूक केले जाईल. शर्यतीचा शेवट अनेकदा विवाद्य ठरणे शक्य असते. हे टाळण्यासाठी, प्रत्येक शर्यत छायाचित्रपटावर चित्रित होण्याची व्यवस्थाही करण्यात आली आहे. शर्यत सुरू झाल्यापासून तिचे शेवटचेही छायाचित्र त्या छायाचित्र-पट्टीवर घेतले जाईपर्यंत वेळ किती झाला हेही त्या छायाचित्रावर आपोआपच नमूद होणार आहे. कोणतीही शर्यत संपल्यापासून अदमासे ४५ सेकंदांत तिची अशी छायाचित्रपट्टी पंचांच्या हाती येईल.

बॅडमिंटन, जिम्नॅस्टिक्स् आणि व्हॉलिबॉल या खेळांच्या स्पर्धेसाठी एक बंदिस्त प्रेक्षागृह यमुनेच्या काठी, पुराणकालीन इंद्रप्रस्थ या राजधानीच्या स्थानी बांधलेले

आहे. यातील क्रीडाचौक ७८ मीटर्स लांब व ६० मीटर्स रुंद आहे. एका वेळी २५ हजार प्रेक्षक येथे क्रीडास्वाद घेऊ शकतील. या क्रीडांगणात मधोमध एक सरकती भिंत ( पार्टिशन ) घालून एकाच वेळी दोन खेळांचे सामने करणे शक्य होणार आहे. ही भिंत आवाजलहरी रोखणारी असल्याने एका सामन्यातील आवाजाचा त्रास दुसऱ्या सामन्यास होणार नाही. अशा प्रकारचे हे भारतातील पहिलेच बंदिस्त क्रीडा प्रेक्षागार होय. नेहरू स्टेडियमसाठी अदमासे २० कोटी रुपये तर या बंदिस्त प्रेक्षागारासाठी अदमासे २ कोटी रुपये खर्च होणार आहे.

सायकल स्पर्धेसाठी एक खास आकाराची मार्गपट्टी लागते. वळणावरून वेगाने जाताना वाहनाचा कल एका बाजूस झुकतो. हा अनुभव रस्त्यावरून जाताना किंवा क्रीडांगणात पळताना येतो. वाहनाच्या या झुकण्याने वेगावर परिणाम होऊ नये यासाठी सायकल स्पर्धेची पट्टी विशिष्ट आकाराची केली जाते. वळणावर ही पट्टी बाजूस उंच व आत उतरती अशी असते. आतून बाहेरच्या बाजूस या उताराचा कोन जास्तीत जास्त ३८ अंशापर्यंत व कमीत कमी ९ अंश इतका असतो. अशी सायकल पट्टी उपरोक्त इंद्रप्रस्थ बंदिस्त क्रीडाप्रेक्षागाराच्या जरा उत्तरेस तयार करण्यात आली आहे. तिची रुंदी सात मीटर व एकूण लांबी ३३३·३३ मीटर्स आहे. येथे दोन हजार प्रेक्षकांची कायमची सोय असून ऐनवेळी मंडप वगैरे घालून अधिक प्रेक्षकांची बसण्याची सोय करता येईल. या सायकल स्पर्धा अंगणास अदमासे एक कोटी रुपये खर्च झाला.

पहिले आशियाई सामने १९५१ साली ज्या नॅशनल स्टेडियममध्ये झाले त्या स्टेडियवर पाच हजार प्रेक्षक बसण्याची सोय होती. आता ही सोय ७५ हजार प्रेक्षक बसतील एवढी वाढविण्यात येत आहे. येथे नवव्या आशियाई सामन्यांतील पुरुषांचे हॉकी सामने होतील. त्यासाठी क्रीडांगणाच्या मध्यभागी कृत्रिम, प्लॅस्टिकचे ' ॲस्ट्रोटर्फ ' पसरण्यात आले आहे. अलीकडे हॉकीच्या स्पर्धा नैसर्गिक हिरवळीवर न घेता त्या कृत्रिम हिरवळीवर म्हणजे ॲस्ट्रोटर्फवरच घेण्याची प्रथा जगभर आहे. या कृत्रिम हिरवळीवर स्थानिक मातीचा, उन्हा-पावसाचा, दवा-बर्फाचा जाणण्याजोगा परिणाम होत नसल्याने या कृत्रिम हिरवळीवर सामने घेणे हे सामन्यातील खेळासाठी वस्तुनिष्ठ स्थिती असण्याच्या दृष्टीने सोयीचे होते. हिंदुस्थानात या ॲस्ट्रोटर्फची व्यवस्था या आशियाई सामान्याच्या निमित्ताने प्रथमच होत आहे. नॅशनल स्टेडियमचे प्रेक्षागार वाढविणे आणि ॲस्ट्रोटर्फ पसरणे वगैरे आधुनिकीकरण या साऱ्यास मिळून जवळजवळ तीन कोटी रुपये खर्च होणार आहे. नव्या दिल्लीतील हौज खास भागातील टेनीस स्टेडियमवर असणाऱ्या हिरवळीच्या टेनिस कोर्टांमध्ये आणखी दोन नव्या कोर्टांची भर घालून एकूण ११ हिरवळीच्या कोर्टांची तरतूद करण्यात आली आहे.

प्रथम तर तालकटोरा उद्यानात बंदिस्त तलाव तैराकी स्पर्धांसाठी बांधण्याचा विचार होता. पण आता अद्ययावत उत्तम दर्जाचा पण खुला तलाव बांधण्यात आला आहे.

याखेरीज महिलांच्या हॉकी स्पर्धा दिल्लीत अगदी मध्यवस्तीत कॅनॉट प्लेस-

जवळ भगतसिंग मार्गावर असलेल्या शिवाजी स्टेडियमवर होणार असून त्यासाठी त्या स्टेडियमच्या क्रीडांगणात व प्रेक्षागारात आवश्यक त्या सुधारणा केल्या गेल्या आहेत. त्याचप्रमाणे काही फुटबॉल सामने दिल्लीस कोटला मैदानाजवळ असलेल्या आंबेडकर स्टेडियममध्ये होणार असल्याने त्याच्याही क्रीडांगणात व प्रेक्षागारात आवश्यक त्या सुधारणा केल्या जात आहेत. घुडसवारी म्हणजे अश्वारुढ क्रीडास्पर्धांसाठी निक्लसन रेंजवर हर्वक्ष प्रेक्षागार सिद्ध आहे. बंदुकीच्या पिस्तुलाच्या नेमबाजीस्पर्धा तुघलकाबाद रेंजवर होणार आहेत. शिवाय सोईसाठी, बोट वल्हविण्याच्या स्पर्धा जयपूरच्या रामगड सरोवरात व शिडाच्या बोटींच्या स्पर्धा मुंबईच्या बंदराजवळ अरबी समुद्रात होणार आहेत.

जेथे जेथे स्पर्धा, सामने होणार आहेत तेथे तेथे कालमापनासाठीची, अंतर मोजण्याची वगैरे यंत्रे, गुणफलक इत्यादी सर्व शक्यतो अत्याधुनिक साधनेच वापरली जाणार आहेत.

नवव्या आशियाई सामन्यांसाठी होणारे आणखी एक महत्त्वाचे बांधकाम म्हणजे खेळाडूंच्या निवासासाठी उभारण्यात येत असलेले ‘ एशियाड ग्राम ’. येथे सहा हजार खेळाडूंची, त्यांच्या व्यवस्थापकांची, शिक्षकांची केवळ राहण्या–जेवण्याचीच सोय नसेल तर, त्यांच्या सरावासाठी आवश्यक ती क्रीडांगणे, व्यायामशाला या ग्रामात उपलब्ध असतील. जीवनावश्यक वस्तूंची, औषधांची दुकाने, रुग्णालये, मनोरंजनस्थाने इत्यादी सर्व प्रकारची सोय या ‘ एशियाड ग्रामात ’ असेल. या सिद्धतेचा खर्च अदमासे २० कोटी रुपये वा त्याहूनही अधिक येईल.

हे खर्चाचे आकडे पाहता हा काहीतरी भयंकर खर्च भारतासारखा गरीब देश करीत आहे अशी प्रथमदर्शनी समजूत होणे शक्य आहे. परंतु या विषयाचा सम्यक विचार केला तर मात्र ही केवळ गैरसमजूत असल्याचेच लक्षात येईल.

कोणत्याही विषयावर वादंग माजू शकतो किंबहुना तो लोकशाहीत आवश्यकच आहे अशी काही असामींची समजूत असल्यानेच की काय पण हे नववे आशियाई सामने आणि त्यावर होणारा खर्च यावरही बरेच वाद झाले. या वादात अनेक वयोवृद्ध राजकारणीही भाग घेते झाले.

नवव्या आशियाई क्रीडास्पर्धा १९८२च्या अखेरीस होणाऱ्या असल्या तरी त्यांना आमंत्रण दिले गेले ते मात्र १९८२ साली असलेल्या सरकाराच्या आधीच्या सरकारच्या काळात. त्यानंतरच्या राजकीय उलथापालथीत या आशियाई सामन्यांच्या तयारीच्या कार्याकडे जवळजवळ पूर्णतः दुर्लक्षच झाले. १९८०च्या जानेवारी महिन्यात जे सरकार स्थापन झाले त्याच्यापुढे या सामन्यांची तयारी दोन वर्षांत करण्याचा व आवश्यक ती सारी मदत करण्याचा प्रश्न होता. हे सामने भारतात नकोत असे म्हणणे त्या सरकारास अशक्यच होते, कारण एकदा दिलेले आमंत्रण भारताने किंवा कोणत्याही राष्ट्राने परत घेतले असता त्या राष्ट्राबद्दल वाईट मत होण्याची शक्यता असते. शिवाय



इंद्रप्रस्थ क्रीडाप्रेक्षागृहातील क्रीडांगणाची सिद्धता.

नव्या दिल्लीतील भगतसिंग मार्गावरील "शिवाजी क्रीडाप्रेक्षागृह"
आशियाई स्पर्धांसाठी तयार केले जात असताना ....



नव्या दिल्लीतील इंद्रप्रस्थ भागातील बंदिस्त क्रीडाप्रेक्षागृह



इंद्रप्रस्थ क्रीडाप्रेक्षागृहातील प्रेक्षागार

आशियातील त्यातल्या त्यात प्रगत अशा भारताने जर दिलेले आमंत्रण परत घेतले असते तर भारताने जबाबदारी टाळली असेच झाले असते.

एकदा नववे आशियाई सामने वा तत्सम सांस्कृतिक आंतरराष्ट्रीय महोत्सव आपल्या देशात करावयाचा म्हटला म्हणजे तो आपल्या देशाच्या दर्जास शोभेसाच घडविणे हेच केव्हाही इष्ट होय. भारत आर्थिकदृष्ट्या, वैज्ञानिकदृष्ट्या व सामाजिक स्वास्थ्याच्याही दृष्टीने आशियातील नवस्वतंत्र देशांत सर्वाधिक प्रगत देश आहे. त्याच्या या कीर्तीस अणुमात्रही डाग लागणार नाही अशी काळजी हे आशियाई सामने भरविताना, त्यासाठी येणाऱ्या पाहुण्यांची व्यवस्था ठेवताना घेणे हे अवश्यच होय. त्यानुसार इष्ट तो खर्च करणे अपरिहार्यच ठरते.

शिवाय हा सारा खर्च विशेषतः क्रीडांगणे, प्रेक्षागृहे आणि 'एशियाड ग्राम' याच्या बांधणीचा खर्च हा केवळ क्रीडास्पर्धेसाठीच झालेला खर्च नव्हे. कारण ही सारी बांधकामे कायमच्या सुविधा, मालमत्ता म्हणून निरंतर उपयोगी पडणार आहेत. उदाहरणार्थ, एशियाड ग्राम ही वसाहत हे आशियाई सामने संपल्यानंतर दिल्लीतील अन्य सरकारी वसाहतीप्रमाणे राजधानीतील वाढत्या लोकसंख्येस निवासस्थाने म्हणून उपलब्ध करून दिली जाणार आहे. थोडक्यात सांगावयाचे तर बांधकामे, ह्या सुविधा केव्हा ना केव्हा तरी किंवहुना येत्या पाच-पंधरा वर्षांत भारताच्या राजधानीत सिद्ध केल्या गेल्याच असत्या. त्या या आशियाई क्रीडास्पर्धांच्या निमित्ताने काही वर्षे आधी केल्या गेल्या इतकाच मात्र याचा अर्थ होय.

हे सारे लक्षात घेता आणि अशा प्रकारचे आंतरराष्ट्रीय क्रीडामहोत्सव, व्यापारी प्रदर्शने इत्यादी एखाद्या देशात पाच-पंचवीस वर्षांत एखादे वेळीच घडतात हेही लक्षात घेता घडला हा खर्च अवाजवी मानणे चुकीचेच ठरावे. ज्या ज्या देशात असा आंतरराष्ट्रीय महोत्सव वा ऑलिंपिकसारखे सामने घडतात तेथे तेथेही अशाच विचाराने खर्च केला जातो हीही बाब लक्षात ठेवण्याजोगी आहे. नवव्या आशियाई सामन्यांसाठी केलेल्या क्रीडांगणांची, प्रेक्षागारांची तयारी दुसऱ्याही एका दृष्टीने वाजवीच ठरावी. भारत ऑलिंपिक मंडळाच्या प्रवर्तकांची इच्छा तर ऑलिंपिक सामने भारतात १९२८ साली नाही तर १९३२ साली तरी भरवावे इतकी उमेदीची, तडफेची होती. त्या काळात भारत स्वतंत्र नसल्याने ती उमेद कदाचित अव्यवहार्य असेल. पण आता भारत स्वतंत्र झाल्यानंतर आणि त्याची सर्वांगीण प्रगती होत असता आज ना उद्या सार्वराष्ट्रीय ऑलिंपिक क्रीडास्पर्धा भारतात बोलावणे हे उचितच ठरावे. या स्पर्धांसाठी लागणारी क्रीडांगणे, प्रेक्षागारे वगैरे सारे एकदम करण्यापेक्षा टप्प्याटप्प्याने करीत राहणे हेच सोईचे होय. त्या दृष्टीनेही या आशियाई स्पर्धांच्या निमित्ताने पहिले पाऊल उचलले गेले असे म्हणावयास हरकत नाही. भारत ऑलिंपिक मंडळाच्या संस्थापकांनी ऑलिंपिक सामने देशात भरविण्याचे ठरविलेले उद्दिष्ट पुरे करण्याच्या दृष्टीने पहिले पाऊल पडले पहिल्या आशियाई सामन्यांच्या रूपाने. आता दुसरे पाऊल पडत आहे ते नवव्या आशियाई क्रीडास्पर्धांच्या रूपाने.

एवढ्या मोठ्या प्रमाणावर आणि पद्धतशीर, भारताच्या सध्याच्या प्रगत अवस्थेस शोभेशा दर्जाचे असे आशियाई सामने करावयाचे तर त्यासाठी बरीच तयारी करणे आवश्यकच होय. या सामन्यांना भारतातर्फे आमंत्रण जरी जनता पक्ष सत्तारूढ असताना दिले गेले तरी त्या काळात व नंतरच्या सहा महिन्यांतही या क्रीडास्पर्धांच्या तयारीच्या दृष्टीने फारसे काही घडलेच नाही असे म्हटले तरी ते वावगे ना ठरावे. नंतर आलेल्या सरकारने याबाबत विशेष लक्ष घातले. या स्पर्धा मोठ्या प्रमाणावर आणि भारतास आज जगात व विशेषतः विकसनशील देशांमध्ये असलेल्या विशिष्ट स्थानास शोभेशा पद्धतीने करण्याचा निर्णय घेण्यात आला. त्याच्या अंमलबजावणीसाठी भारत सरकारने दोन महत्त्वाच्या समित्या स्थापन केल्या त्यांपैकी एक मार्गदर्शक समिती (स्टिअरिंग कमिटी). या समितीशी सरकारचा प्रत्यक्ष संबंध आहे. ही केंद्रीय मंत्रिमंडळाची समिती असून तिच्यात संबंधित असे अनेक केंद्रीय मंत्री व राज्यमंत्री आहेत. या समितीच्या अध्यक्ष-पदी तत्कालीन शिक्षणमंत्री म्हणजेच आजचे नियोजनमंत्री श्री. शंकरराव चव्हाण हे असत. आता त्या जागी सध्याच्या शिक्षणमंत्री सौ. शीला कौल ह्या आहेत. या समितीस धोरणविषयक व आर्थिक निर्णय घेण्याचे जवळ जवळ सर्वाधिकार असल्याने या समि-तीस वारंवार सरकारी परवानगीसाठी कोठे धाव घ्यावी लागत नाही. दुसरी समिती ही खास संघटना समिती ( स्पेशल ऑर्गनायझिंग कमिटी ) म्हणून नेमली गेली. तिच्या अध्यक्षपदी केंद्रीय क्रीडा मंत्रालयाचे राज्यमंत्री सरदार बुटासिंग हे आहेत. तिच्या उपाध्यक्षपदी पुढील पाच जण आहेत : राज्यसभेचे माजी उपाध्यक्ष खासदार रामनिवास मिर्धा, खासदार सरदार चरणजितसिंग, भारताचे सरसेनानी, श्री. के. शंकरन नायर, आणि श्री. उमरावसिंग. यांपैकी श्री. बुटासिंग व श्री. मिर्धा हे केवळ त्यांच्या राजकीय स्थानपरत्वे या समितीत आलेले नाहीत. हे दोघेही जण त्यांच्या युवा अवस्थेत चांगले खेळाडू होते व त्यानंतर अनेक अखिल भारतीय क्रीडा-संघटनांच्या पदाधिकारपदी ते असत आले आहेत. ह्या खास समितीने त्यानंतर विषयवार अनेक समित्या नेमल्या आहेत. त्यांपैकी तंत्रज्ञ समिती ही प्रत्येक स्पर्धा तंत्रशुद्ध पद्धतीने पार पाडण्याची जबाबदारी संभाळेल. स्पर्धांना लागणारी उपकरणे व क्रीडासाहित्य सिद्ध ठेवणारी एक वेगळी समिती आहे. प्रत्येक स्पर्धेच्या ठिकाणी विविध अधिकारी, पंच, वृत्तपत्रे, गुणफलक इत्यादींशी परस्पर संपर्क ठेवणे ही एक किचकट व जबाबदारीची कामगिरी आहे. त्यासाठी एक स्वतंत्र 'इलेक्ट्रॉनिक समिती' नेमण्यात आली आहे. याशिवाय स्पर्धा उपसमिती, वाहतूक उपसमिती, निवास उप-समिती, वैद्यकीय सहाय्य उपसमिती, छपाई व प्रसिद्धी उपसमिती, स्वागत व यजमान-कृत्य उपसमिती इत्यादी १४ उपसमित्या कार्यरत झाल्या. या समित्यांचे काम एकसूत्री पद्धतीने चालावे यासाठी या सर्व समित्यांच्या कचेऱ्या नव्या दिल्लीत प्रगती मैदानावरील इमारतीत ठेवण्यात आल्या.

एखाद्या महोत्सव प्रसंगाने झालेले बांधकाम हे पुढेही कसे उपयुक्त ठरते याचा

हा एक पुरावाच होय. ' प्रगती मैदान ' यालाच पूर्वी प्रदर्शन मैदान ( एक्झिबिशन ग्राऊंड ) म्हणत असत. १९७२च्या हिवाळ्यात या मैदानात फार मोठ्या प्रमाणावर आंतरराष्ट्रीय असे व्यापारी प्रदर्शन भरविण्यात आले होते. मोठ्या अवजड यंत्रांपासून ते ग्रामोद्योगातून निर्माण झालेल्या छोट्या शोभा-वस्तूंपर्यंत अनेक वस्तू जगातील विकसित व विकसनशील अशा दोन्ही प्रकारच्या देशांनी या प्रदर्शनात मांडल्या होत्या. या प्रदर्शनाच्या उपयोगासाठी आंतरराष्ट्रीय महाल ( हॉल ऑफ नेशन्स ), आंतरराज्य महाल ( हॉल ऑफ स्टेटस् ) अशा दोन खूपच मोठ्या इमारती आणि जवळजवळ शंभर छोट्या इमारती व प्रदर्शनगृहे ( पॅव्हेलियन्स ) उभारण्यात आली. त्या वेळी अनेकांनी या बांधकामांवर म्हणजे त्यावर होणाऱ्या खर्चावर बरीच टीका केली होती. आज प्रगती मैदानावर प्रदर्शनांची कायमची तर सोय झालीच आहे आणि दरसाल अनेक राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय प्रदर्शने तेथे भरत असतातही; पण या इमारतींचा आशियाई क्रीडा महोत्सवाच्या मुख्य कचेरीसारखा अनेक कामांना उपयोग होत आहे. १९७२ मध्ये या साऱ्या बांधकामावर झालेली टीका अशा प्रकारे गैरवाजवी ठरली आहे. नवव्या आशियाई क्रीडास्पर्धांसाठी होणाऱ्या बांधकामावरील टीकाही तशीच गैरवाजवी ठरण्याचाच संभव मान्य करावा लागेल.

यजमान राष्ट्र म्हणून भारत ही सर्व तयारी करीत आहे. पण प्रत्यक्ष नवव्या आशियाई सामन्यांवर नियंत्रण आशियाई क्रीडा संघटनेचे राहील. ही संघटना म्हणजेच एशियन गेम्स फेडरेशन. ही १९५१ साली पहिल्या आशियाई सामन्यांच्या नंतर लगेचच स्थापन करण्यात आली. तिच्या नियामक मंडळावर म्हणजे कौन्सिलवर प्रत्येक सभासद राष्ट्रास तीन प्रतिनिधी नेमता येतात. त्यातूनच कार्यकारी मंडळ व अन्य समित्या निवडल्या जातात. सामान्यतः जेथे आशियाई क्रीडास्पर्धा होतील त्या राष्ट्रातील व्यक्तीची निवड या संघटनेच्या अध्यक्षपदी व चिटणीस – खजिनदार या दोन पदांवर केली जाते. हे पदाधिकारी त्यानंतरच्या आशियाई स्पर्धा पुऱ्या होईतो अधिकारावर राहतात.

या संघटनेच्या नियामक मंडळाने २६ नोव्हेंबर १९८१ रोजी नव्या दिल्लीत झालेल्या त्यांच्या सभेत एक महत्त्वाचा निर्णय घेतला आहे. त्या निर्णयानुसार आता या संघटनेचे नामांतर होणार आहे. तिचे नाव आता ' ऑलिंपिक कौन्सिल ऑफ एशिया ' असे करण्यात येणार आहे. जुन्या एशियन गेम्स फेडरेशनची अखेरची सभा नव्या दिल्लीत ५ डिसेंबर १९८२ रोजी म्हणजे नवव्या आशियाई क्रीडास्पर्धा संपताच होणार आहे.

या नामांतरामुळे या संघटनेचा आणि त्याबरोबरच आशियाई क्रीडास्पर्धेचा दर्जा थोडासा उंचावला जावा अशी अपेक्षा आहे. युरोपीय क्रीडास्पर्धा या सार्वराष्ट्रीय ऑलिंपिक क्रीडास्पर्धेची चाचणी वा पूर्वतयारी अशा स्वरूपाची मानली जाते आणि त्यात सहभागी होण्यासाठी युरोपीय राष्ट्रांत जिद्दीने स्पर्धा होतात. तसेच आशियात वढावे हा

या नामांतरामागील एक अव्यक्त पण सर्वज्ञात हेतू आहे. तो सिद्ध होणे अखेर प्रत्यक्ष आशियाई क्रीडास्पर्धेच्या दर्जावर म्हणजेच एकूण आशियातील क्रीडाकौशल्यावर, क्रीडा-साधनांच्या प्रगतीवरच अवलंबून राहील.

एकीकडे आशियाई क्रीडास्पर्धा या कायमच्या चालू राहाव्या व स्थिर व्हाव्या यासाठी जबाबदार संघटनात्मक व्यवस्था होत असताच प्रत्यक्षात आठ आशियाई स्पर्धा झाल्या. त्यांत भाग घेणाऱ्या देशांची खेळाडूंची संख्या वाढत गेली.

* * *

# आठ आशियाई स्पर्धांतील भारताचे यशापयश



पहिल्या आशियाई सामन्यांत सहा क्रीडा-प्रकारांतील पंचावन्न स्पर्धांत अकरा राष्ट्रांतील सहाशे स्त्री-पुरुष उमेदवारांनी भाग घेतला. त्यात जपानने २४ तर भारताने १६ सुवर्णपदके मिळविली. त्यात एक वैशिष्टय असे होते की, जपानने मिळविलेल्या २४ सुवर्णपदकांपैकी २० केवळ ॲथलेटिक्समधील होती, आणि त्यापैकी ११ पुरुषांनी तर ९ महिलांनी जिंकली होती. आश्चर्य असे की, जपानला तैराकीमध्ये मात्र एकही पदक मिळू शकले नाही. १०० मीटर्स अंतर १०.८ सेकंदांत तोडून भारताचा लेव्ही पिंटो हा आशियातील सर्वांत द्रुतगती पुरुष ठरला. इराणचा पराभव करून भारताने फुटबॉलचे पदकही मिळविले. ज्यामध्ये भारताला कोठलेही पदक मिळाले नाही असा कोठलाच क्रीडाप्रकार त्या वेळी राहिला नाही. इराणने भारोत्तोलन ( वजन उचलणे ) या क्रीडास्पर्धाप्रकारात ७ सुवर्णपदके मिळविली. त्यांच्या एम नामदज्यो याने एकूण ७०० पौंड वजन उचलून बॅटमवेट या विभागात जागतिक उच्चांक प्रस्थापित केला.

दुसरी आशियाई क्रीडास्पर्धा १९५४मध्ये फिलिपिन्सची राजधानी मॅनिला येथे झाली. आठ क्रीडाप्रकारांतील सत्त्याहत्तर स्पर्धांत मिळून अठरा देशांच्या १,०२१ क्रीडापटूंनी भाग घेतला. भारतात झालेल्या पहिल्या स्पर्धांत दुचाकी स्पर्धा होत्या. त्या मॅनिलात नव्हत्या. परंतु कुस्ती, मुष्टियुद्ध, बंदुकीची नेमबाजी हे तीन प्रकार दुसऱ्या आशियाई क्रीडास्पर्धेत समाविष्ट झाले. नेपाळ, इराण यांनी प्रत्यक्ष भाग घेतला नाही. परंतु हाँगकाँग, इझरेल, दक्षिण कोरिया, मलेशिया, उत्तर बोर्निओ, पाकिस्तान, विएतनाम, कांपुचिया आणि तैवान हे नऊ देश या स्पर्धेत नव्याने सहभागी झाले. ३८ सुवर्णपदके जिंकून जपान पुन्हा एकदा उच्च स्थानावर राहिला. दिल्लीच्या आशियाई स्पर्धेत चौथ्या क्रमांकावर आलेल्या फिलिपिन्सने स्वदेशात झालेल्या, दुसऱ्या आशियाई स्पर्धेत १४ सुवर्णपदके जिंकून दुसरे स्थान प्राप्त करून घेतले. त्यामुळे भारत तिसऱ्या क्रमांकावर घसरला. त्याखालोखाल पाकिस्तान, तैवान, इझरेल, ब्रह्मदेश,

सिंगापूर यांचे क्रमांक ओळीने लागले. उरलेल्या अकरा देशांना एकही सुवर्णपदक मिळाले नाही.

तिसरी आशियाई क्रीडास्पर्धा जपानची राजधानी टोकिओ येथे १९५८मध्ये झाली. तेरा क्रीडाप्रकारांतील १११ स्पर्धांमध्ये मिळून २० देशांच्या १,४०० खेळाडूंनी या स्पर्धेत भाग घेतला. नेपाळ आणि इराण हेही टोकिओच्या स्पर्धेत सहभागी झाले होते. हॉकी, हिरवळीवरील टेनिस, टेबल टेनिस, व्हॉलीबॉल या खेळांचा नव्याने समावेश झाला आणि दुचाकी-स्पर्धांनी पुनःप्रवेश मिळविला. ६७ सुवर्णपदके मिळवून जपान पुन्हा एकदा म्हणजे ओळीने तिसऱ्यांदा आशियाई क्रीडास्पर्धेत सर्वोच्च स्थान मिळविता झाला. त्याच्या खालोखाल आलेल्या फिलिपिन्सने केवळ ८ च सुवर्णपदके मिळविली. पहिल्या व दुसऱ्या क्रमांकातील हा फरक जपानचे श्रेष्ठत्व किती व्यापक व ठाम होते ते दर्शवितो. फिलिपिन्सच्या खालोखाल दक्षिण कोरिया, इराण, तैवान, पाकिस्तान, भारत, विएतनाम, ब्रह्मदेश व सिंगापूर यांचे त्या ओळीने क्रम लागले. याचा अर्थ भारत आता सातव्या क्रमांकापर्यंत घसरला. भारताच्या दृष्टीने समाधानाची गोष्ट इतकीच की, मिल्खासिंग याने २०० मीटर्स व ४०० मीटर्स या दोन्ही शर्यतींत सुवर्णपदके मिळविली. इतकेच नव्हे तर २१·६ सेकंदे आणि ४७·०० सेकंदे असे दोन नवे विक्रम अनुक्रमे २०० मीटर्स व ४०० मीटर्स अंतर धावण्यात त्याने केले. परंतु या आशियाई स्पर्धेत भारतास एक मोठा धक्का बसला. ह्या आधी ३० वर्षे हॉकी या खेळात साऱ्या जगात सम्राट असलेला भारत या वेळी अंतिम सामन्यात पाकिस्तानचा पराभव करू शकला नाही. दोघांचे शून्य गोल होऊन बरोबरी झाली. पण एकूण या आशियाई सामन्यांत दोघांनी केलेले गोल व दोघांवर झालेले गोल यांच्या हिशेबात सुवर्णपदक पाकिस्तानला मिळाले. या टोकिओ येथील आशियाई क्रीडास्पर्धेचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे २६ मैल ३८५ यार्ड एवढ्या अंतराच्या म्हणजे मॅरेथॉन स्पर्धेस तिच्या साऱ्या मार्गावर कधी नव्हे इतके प्रेक्षक होते. निदान वीस लाख स्त्री-पुरुषांनी ही स्पर्धा पाहिली असावी असा अंदाज आहे.

चौथी आशियाई क्रीडास्पर्धा इंडोनेशियाची राजधानी जकार्ता येथे १९६२ साली झाली. तेरा क्रीडा प्रकारांतील १११ स्पर्धांत मिळून वीस देशांच्या १,५०० क्रीडापटूंनी या वेळी भाग घेतला. एकाही खांबाचा आधार नसून एक लाख प्रेक्षक बसतील एवढ्या आकाराचा असलेला स्टेडियम हे या आशियाई स्पर्धेचे एक आकर्षण ठरले. इझ्रेल आणि तैवान या दोन देशांशी इंडोनेशियाचे राजनैतिक संबंध नसल्याने त्यांना या आशियाई स्पर्धेत भाग घेता आला नाही. आधीच्या तीन आशियाई स्पर्धा-प्रमाणेच या चौथ्या स्पर्धेतही जपाननेच सर्वोच्च स्थान जिंकले. भारत थोडा वर आला. म्हणजे तिसऱ्या आशियाई स्पर्धेत त्याला सातवे स्थान मिळाले होते तर या वेळी तिसरे स्थान मिळाले ! पण जपानने ७१ सुवर्ण, ५६ रौप्य व १९ कांस्य पदके पटकाविली, तर भारताने मात्र केवळ १० सुवर्ण, १२ रौप्य व १० कांस्य इतकीच मिळविली. पंजाबचा

मालवा, महाराष्ट्राचे मारुती माने आणि गणपत आंदळकर या कुस्तिगीरांनी भारतास तीन सुवर्णपदके मिळवून दिली. अन्य कुस्तिगीरांनी मिळून रौप्य, कांस्य वगैरे नऊ पदके मिळविली. १० हजार मीटर्स पळण्याची शर्यत जिंकून त्रिलोकसिंगने सुवर्णपदक मिळविले, तर मोहिंदरसिंग व मिल्खासिंग यांनी अनुक्रमे १५०० मीटर्स व ४०० मीटर्स अंतराच्या शर्यतीत सुवर्णपदके मिळविली. ४×४०० या टप्प्याच्या शर्यतीत (रीले रेसमध्ये) भारताने सुवर्णपदक मिळविले. त्यामुळे एकूण ॲथलेटिक्समध्ये भारताचा क्रमांक दुसरा लागला. अखेरच्या सामन्यात दक्षिण कोरियाचा पराभव करून भारताने फुटबॉलचे सुवर्णपदक पुनरपि मिळविले. पण हॉकीचे सुवर्ण पदक त्याला मिळविता आले नाहीच. या वेळी तर अंतिम सामन्यांत पाकिस्तानने भारताचा दोन गोल्सनी पराभव केला. मुष्टियुद्धाच्या लाईटवेट विभागात पद्मबहादुरमल याने सुवर्ण-पदक तर मिळविलेच पण "आशियातील सर्वोत्कृष्ट मुष्टियोद्धा" म्हणूनही त्याचे नाव घोषित करण्यात आले.

पाचवी आशियाई क्रीडास्पर्धा १९६६च्या अखेरीस थायलंडची राजधानी बँकॉक येथे झाली. तेरा क्रीडाप्रकारांतील १४० स्पर्धा मिळून १८ देशांतील १,९४५ स्त्री-पुरुष खेळाडूंनी या स्पर्धांत भाग घेतला. सुवर्णपदकांपैकी ७७ पदके जिंकून जपानने आणखी एकदा आपले श्रेष्ठत्व सिद्ध केले. त्या खालोखाल क्रम मिळविलेल्या थायलंडने केवळ १३ सुवर्णपदके मिळविली. हे लक्षात घेता जपान क्रीडाक्षेत्रात इतर आशियाई राष्ट्रांच्या कितीतरी पुढे असल्याचेच एकदा नव्हे, दोनदा नव्हे तर आता पाचव्यांदा सिद्ध झाले. पाचव्या आशियाई क्रीडास्पर्धेत भारताचा पाचवा क्रमांक आला. त्यास ७ सुवर्ण, ३ रौप्य व ११ कांस्य मिळून एकूण २१ पदके मिळाली. थायलंड व मलेशिया यांनी याहून अधिक पदके मिळवून तिसरा व चौथा क्रमांक मिळविला. भारताच्या खालोखाल खालील राष्ट्रे या ओळीने क्रमांक मिळविती झाली : इराण, इंडोनेशिया, फोर्मोसा, इझरेल, फिलिपिन्स, पाकिस्तान आणि ब्रह्मदेश. भाग घेतलेल्यांपैकी सिंगापूर, दक्षिण कोरिया, विएतनाम, सिलोन, हाँगकाँग, अफगाणिस्थान आणि नेपाळ या राष्ट्रांना एकही पदक मिळविता आले नाही. ६ फूट ८.७५ इंच इतकी उंच उडी मारून भीमसिंगने भारतास उंच उडीचे सुवर्णपदक मिळवून दिले. ८०० मीटर्स अंतर एक मिनिट व ४९.४ सेकंदे इतक्या वेळात तोडून बुगेश्वर बरुआ या भारतीय स्पर्धकाने सुवर्णपदक तर जिंकलेच पण नवा आशियाई उच्चांक प्रस्थापित केला. जोगिंदरसिंगने गोळाफेक (शॉटपट) या स्पर्धेत सुवर्णपदक मिळविले. पण त्याचा पराक्रम अपेक्षेहून काहीसा कमी पडला. त्याने गोळा १६.२२ मीटर्स एवढ्याच अंतरावर फेकला. ही उणीव प्रवीणकुमार याने भरून काढली. या ६ फूट ७ इंच इतक्या उंचीच्या खेळाडूने थाळी (डिस्कस) ४९.६ मीटर्स इतक्या अंतरावर फेकून नवा आशियाई उच्चांक प्रस्थापित केला. मुष्टियुद्धाच्या हेवीवेट विभागात हवासिंग याने भारतास सुवर्णपदक मिळवून दिले. पण भारताच्या दृष्टीने सर्वांत महत्त्वाचा

विजय ठरला तो हॉकीमध्ये. अंतिम सामन्यात पाकिस्तानचा पराभव करून सुवर्णपदक जिंकून भारताने आधीच्या दोन आशियाई स्पर्धांतील पराजयाचे उट्टे काढले ! पण बँकॉकच्या आशियाई क्रीडास्पर्धेतील भारताच्या दृष्टीने अत्यंत खेदाची गोष्ट अशी की कुस्तीमध्ये भारतास एकही सुवर्णपदक मिळाले नाही !

सहाव्या आशियाई क्रीडास्पर्धा दक्षिण कोरियात व्हावयाच्या ठरल्या होत्या. पण सोळा महिन्यांनंतर त्याने आमंत्रण परत घेतले. एशियन गेम्स फेडरेशनच्या एप्रिल १९६८च्या सभेत या प्रश्नाचा विचार झाला. दुसरे कोणीच यजमानपद स्वीकारण्यास पुढे आले नाही. तेव्हा बँकॉकला या स्पर्धा भरवाव्या असा विचार पुढे आला आणि काही काळ विचार करून थायलंडने यजमानपद पत्करलेही. त्यामुळे १९७०च्या आशियाई क्रीडास्पर्धाही बँकॉक येथेच झाल्या. ॲथलेटिक्स, तराकी, भारोत्तोलन, दुचाकी स्पर्धा, कुस्ती, बंदुकीची नेमबाजी, बॅडमिंटन, हॉकी, फुटबॉल, व्हॉलीबॉल, बास्केट बॉल आणि होडी वल्हविणे ( रोईंग ) या १३ प्रकारांतील मिळून १३४ स्पर्धांत १८ राष्ट्रांतील २,००० खेळाडूंनी भाग घेतला. व्हॉलीबॉल व बॅडमिंटन वगळता बाकी साऱ्या क्रीडाप्रकारांत भारत सहभागी होता. या वेळी ॲथलेटिक्समध्ये भारतीय खेळाडूंचा पराक्रम बराच बरा झाला. या क्रीडाप्रकारात सर्वश्रेष्ठ ठरलेल्या जपानने ११ सुवर्ण, ७ रौप्य, ७ कांस्य पदके मिळून २३ पदके मिळविली, तर त्या खालोखाल म्हणजे ४ सुवर्ण, ५ रौप्य आणि ५ कांस्य मिळून १४ पदके भारताने मिळविली. पण एकूण सर्व क्रीडाप्रकारांतील पदकांच्या हिशेबात मात्र भारताचा पाचवा क्रमांक लागला. कारण त्यास केवळ २५ पदकेच मिळाली ( ६ सुवर्ण, ९ रौप्य, १० कांस्य ). प्रवीण-कुमारने स्वतःच्या उच्चांकात सुधारणा करून नवा आशियाई उच्चांक थाळीफेकीत निर्माण केला. तो ५२·३२ मीटर्स हा होय. जोगिंदरसिंग याचा गोळाफेकीतील पराक्रम या वेळी अपेक्षेनुसार झाला. त्याने गोळा १७·०९ मीटर्स फेकून सुवर्णपदक तर मिळवलेच, पण नवा आशियाई उच्चांकही प्रस्थापित केला. या म्हणजे बँकॉक येथील, सहाव्या आशियाई क्रीडास्पर्धांना भारताच्या क्रीडा-इतिहासात एक आगळे स्थान द्यावयास हवे. या स्पर्धेत भारतीय महिलांनी आंतरराष्ट्रीय स्पर्धेत प्रथमच सुवर्णपदक जिंकले. चंदीगडची कमलजित संधू हिने ४०० मीटर्स धावण्यात हे सुवर्णपदक मिळविले. तिने हे अंतर ५७·३ सेकंदात तोडले. तिची खरी स्पर्धा झाली ती तैवानची ची चेंग या खेळाडूशी. पहिल्या २०० मीटर्सपर्यंत ची चेंग पुढे होती. त्यानंतर थकल्याने वा अन्यथा, तिच्या एका गुडघ्यात तिला वेदना होऊ लागल्या आणि कमलजित पुढे निघून गेली. हा पराभव ची चेंगला काहीसा लागण्याजोगाच होता, कारण तिच्या या स्पर्धेतील अन्य पराक्रमांमुळे तिला या क्रीडास्पर्धेतील सर्वोत्कृष्ट महिला ॲथलिट हा मान मिळाला होता. १०० मीटर्सचे अंतर ११·६ सेकंदांत धावून तिने नवा आशियाई उच्चांकही स्थापिला होता. कुस्तीच्या १०० किलोग्रामखालील वजन गटात चंदगीराम याने सुवर्णपदक जिंकले. १६·११ मीटर्स इतकी उडी मारून मोहिंदरसिंगने तिहेरी उडीचे

( ट्रिपल जंपचे म्हणजे हॉप, स्टेप अँड जंपचे ) सुवर्णपदक जिंकून नवा आशियाई विक्रम केला. हवासिंगने पुन्हा एकदा मुष्टियुद्धात हेवीवेट गटात सुवर्णपदक जिंकले. तरीही भारतावर एक दुःखाचा प्रसंग आलाच. हॉकीत त्याने पाकिस्तानकडून मार खाल्ला, आणि फुटबॉलमध्ये त्याला केवळ तिसऱ्या क्रमांकावर समाधान मानावे लागले.

सातव्या आशियाई क्रीडास्पर्धा या इराणची राजधानी तेहरान येथे १९७४मध्ये झाल्या. त्यात १६ क्रीडाप्रकारांतील १२२ स्पर्धांत मिळून २५ देशांतील ३,००० स्त्री-पुरुष क्रीडापटूंनी भाग घेतला होता. आशियाई क्रीडास्पर्धेत सर्वाधिक सुवर्णपदके आपल्या थलीत टाकण्याची, सर्वश्रेष्ठ ठरण्याची आपली चाल जपानने याही वेळी पुढे चालूच ठेवली. त्याने ६५ सुवर्णपदके जिंकली तर त्या खालोखाल ठरलेल्या चीनने ३१ व त्याबाबत तिसऱ्या क्रमांकावर आलेल्या इराणने २९ इतकीच सुवर्णपदके जिंकली. भारताचा क्रमांक पुन्हा एकदा सातव्या क्रमांकापर्यंत खाली आला. त्याने केवळ ४ सुवर्ण, १२ रौप्य आणि १२ कांस्य पदके मिळविली. दशस्पर्धासमूह ( डेकॅथ्लन ) यात विजयसिंग चौहान याने ७,३७५ गुण मिळवून सुवर्णपदक तर मिळविलेच पण नवा आशियाई उच्चांकही प्रस्थापित केला. केरळचा टी. सी. योहानन याने ८.०७ मीटर्स इतकी लांब उडी मारून सुवर्णपदक मिळविले आणि नवा आशियाई उच्चांक केला. श्रीरामसिंग याने ८०० मीटर्सची धाव १ मिनिट ४७.५७ सेकंदांत पुरी करून सुवर्णपदक जिंकले आणि नवा आशियाई उच्चांकही केला. भारताचे या स्पर्धांतील चौथे सुवर्णपदक शिवनाथसिंगने मिळविले. ५००० मीटर्सचे अंतर १४ मिनिटे २०.५ सेकंदांत तोडून त्याने हा मान मिळविला. त्याने १० हजार मीटर्सच्या शर्यतीत रौप्य पदकही मिळविले. या आशियाई क्रीडास्पर्धांत हॉकीचे सुवर्णपदक पाकिस्तानने आपल्याकडे राखले व भारतास केवळ रौप्य पदकावर स्वतःचे सांत्वन करून घ्यावे लागले.

आठवी आशियाई क्रीडास्पर्धा डिसेंबर १९७८ मध्ये पुनरपि बँकॉक येथेच झाली. १९ क्रीडाप्रकारांत मिळून १८५ स्पर्धांत २१ देशांतील ३,००० स्त्री-पुरुष सहभागी झाले. या स्पर्धांचे एक वैशिष्टय असे की येथे आशियाई उच्चांकाची जणू बरसात झाली. ( हे उच्चांक आशियाई उच्चांकाच्या तक्त्यात दिले आहेत. ) अॅथलेटिक्समध्ये १५०० मीटर्स, ४०० मीटर्स हर्डल्स, ३००० मीटर्स अडथळ्याची शर्यत ( स्टीपल चेस ), तिहेरी उडी, काठीची उडी ( पोलव्हॉल्ट ), भालाफेक, हातोडा फेक या पुरुषांच्या सात बाबींत आणि ८०० मीटर्स; ४×१०० मीटर्स टप्प्याची शर्यत, उंच उडी, थाळाफेक आणि गोळाफेक या महिलांच्या पाच बाबींत मिळून एकूण १२ नवे उच्चांक प्रस्थापित झाले. त्याप्रमाणेच तैराकी ( पोहणे ) या क्रीडाप्रकारात २०० मीटर्स मुक्त रीती ( फ्री स्टाईल ), २०० मीटर्स गोल हात ( ब्रेस्ट स्ट्रोक ), १०० मीटर्स पाठीवर ( बॅक स्ट्रोक ), २०० मीटर्स वैयक्तिक विविध रीती ( मिड्ले ) आणि ४०० मीटर्स वैयक्तिक विविध रीती, या पुरुषांच्या पाच बाबीत आणि २०० मीटर्स

मुक्त रीती, १०० मीटर्स बटरफ्लाय; १०० मीटर्स पाठीवर, ४×४०० मीटर्स विविध रीती संघ स्पर्धा आणि उंचावरील फळीवरून सूर मारणे या महिलांच्या सहा बाबींत आशियाई उच्चांक झाले.

* * *

# राष्ट्रीय क्रीडाधोरण हवेच !



नवव्या आशियाई क्रीडास्पर्धांसाठी प्रत्येक क्रीडांगणावरील स्पर्धेच्या कामाची आणि त्या स्पर्धेसाठी येणाऱ्या खेळाडूंसाठीच्या सुविधांची तयारी केल्यानंतर आपल्या देशाच्या राजधानीत होणाऱ्या या स्पर्धांत आपल्या भारतीय खेळाडूंचा पराक्रम चांगला व्हावा अशी कोणाचीही स्वाभाविकच इच्छा असणार. परंतु ती फलद्रूप होईल अशी लक्षणे मात्र फारशी दिसत नाहीत. पहिल्या आशियाई सामन्यांपासून नंतरच्या सात सामन्यांचे निकाल पाहता भारताचे या स्पर्धांतील पराक्रम सुधारण्याऐवजी हळूहळू कमीकमी होत असल्याची लक्षणे दिसतात आणि गेल्या वर्षी भारतात झालेल्या महत्त्वाच्या स्पर्धा पाहता भारत नवव्या आशियाई स्पर्धांत काही विशेष पराक्रम करील असे मानणे माहितगार तरी धाष्टर्याचे मानत आहेत. या आधीच्या आठ आशियाई स्पर्धांचे निकाल पाहिले, तर एक हॉकी वगळता बाकी अमुक एका खेळात, क्रीडाप्रकारात वा एखाद्या क्रीडाप्रकाराच्या अमुक एक विभागात वा वजनगटात भारत हमखास वा निदान वारंवार जिंकतो असे काही म्हणता येत नाही. नवव्या आशियाई स्पर्धांत एकुणात भारताचा क्रमांक तिसरा, चौथा लागला तरी खूप झाले असाच माहितगारांचा होरा दिसतो. गेल्या वर्षाच्या जूनमध्ये टोकिओ येथे झालेल्या ॲथलेटिक्सच्या स्पर्धांत जपानने १९ सुवर्ण पदके, २० रौप्य पदके, आणि १५ कांस्य पदके मिळून एकूण ५४ पदके मिळवली. त्याच्या खालोखाल चीनने ११ सुवर्ण, ४ रौप्य आणि २ कांस्य पदके मिळवली. तर भारताने त्या खालोखाल पण ५ सुवर्ण, ५ रौप्य आणि ९ कांस्य इतकीच पदके मिळवली. शिवाय नवव्या आशियाई स्पर्धांत पाकिस्तान, उत्तर कोरिया हे देश सहभागी होत आहेत. हे लक्षात घेता तर भारताच्या पराक्रमाबद्दल फार आशा करणे आशाळभूतपणाचेच ठरण्याचा धोका आहे. अन्य खेळांमध्ये एक महिलांची हॉकी आणि कदाचित पुरुषांची कुस्ती व हॉकी वगळता अन्य कोणत्याच खेळात फार काही खात्रीचे यश मिळू शकेल असे गेल्या काही महिन्यांत झालेल्या राष्ट्रकुल स्पर्धादी आंतरराष्ट्रीय सामन्यांच्या निकालाकडे पाहता वाटत नाही.

खेळावयाचे ते केवळ यशासाठी नव्हे तर सहभागाच्या क्रीडानंदासाठी हे जरी खरे

असले तरी व्यवहारात " आपला " संघ, " आपले " खेळाडू जिंकावेत असेच कोणा-लाही वाटणे स्वाभाविक आहे.

भारताची ही इच्छा फलद्रूप होणे कठीण गोष्ट दिसते. याचा विचार करू जाता या देशात खेळांची सातत्याने तयारी घडत नाही, केवळ ऐन वेळची धावपळ, धडपड यांवर विसंबून यशाची आशा केली जाते, असे दिसते. उंचउंच गोपुरे, मंदिरे, गुरुद्वारे, मशिदी, मनोरे यांच्या बांधणीसाठी सुविख्यात असलेल्या भारताला, कळस उंच हवा तर पाया रुंद, खोल व मजबूत असावा लागतो हे माहीत असावयास हवे. पण, क्रीडाक्षेत्रात मात्र पायावाचूनच यशाचा कळस उंच उभारता येईल अशा समजुतीने गेली ३० वर्ष भारतात धडपड चालू असावी असे वाटते.

याबाबत एक उदाहरण प्रस्तुत लेखकास जरूर आठवते. १९५७–५८ मध्ये भारताच्या जिमनॅस्टिक्स संघाला प्रशिक्षण देण्यासाठी दोन शिक्षक सोव्हिएट यूनियनकडून आणविण्यात आले होते. ही व्यवस्था "राजकुमारी अमृत कौर क्रीडाशिक्षण योजने"-नुसार चालली होती. त्या काळी या क्रीडाप्रकारात सोविएट यूनियन अग्रगण्य होते आणि त्यांनी प्रा. झ्झिरॉफ आणि बर्दीव हे दोन खरोखरच निष्णात असे शिक्षक भारतात धाडले होते. त्यांच्या विद्यार्थ्यांत जे भारतीय होते त्यांत दिल्लीचा शामलाल हा त्या वेळचा शालेय विद्यार्थी वगळता बाकी सारे लष्कराच्या शारीरिक शिक्षण विभागातील जवान होते. एक तर यावरूनच लष्कराबाहेर अन्यत्र भारतात जिमनॅस्टिक्स हा क्रीडाप्रकार विशेष चालत नसावा हे उघड दिसते. ही परिस्थिती आजही फारशी बदललेली नाही. त्या सोविएत शिक्षकांच्या मताने त्यांचे विद्यार्थी अशा वयाचे होते की त्यांना नव्याने मुशीत घालणे कठीण, जवळजवळ अशक्यच होते. शिवाय, हे प्रशिक्षण चालू झाल्यानंतर असे ध्यानात आले की, या भारतीय खेळाडूंना काही मूलभूत गोष्टी माहीत नव्हत्या, कारण त्या आधी शिकवलेल्याच नव्हत्या. अखेर या दोन सोविएत शिक्षकांनी " अमृत कौर योजने"स सादर केलेल्या अहवालात असे स्पष्टपणे नमूद केले की, उपलब्ध खेळाडूंतून काही-तरी करून जगज्जेते बनविणे संभवत नाही. भारतासारख्या प्रचंड देशात हजारो शाळकरी मुलांना त्या त्या क्रीडाप्रकारांचे शिक्षण देण्यास प्रारंभ केला तरच भक्कम पाया घातला जाऊन त्यातून काही वर्षांनंतर आंतरराष्ट्रीय दर्जाचे खेळाडू निर्माण होऊ शकतील अशी शिफारस त्यांनी केली. त्या वेळी या सोविएत शिक्षकांशी बोलत असता त्यांनी सहज असे सांगितले की, त्यांचा देश ऑलिंपिक स्पर्धांत हिरवळीवरील हॉकीत १९८० साली भाग घेऊ इच्छितो व त्या दृष्टीने " आतापासून " तयारी सुरू होत आहे. तयारीसाठी सोविएत यूनियनने त्या वेळी म्हणजे १९५८च्या सुमारास उत्तम भारतीय हॉकी शिक्षक मुद्दाम सोविएत यूनियनमध्ये नेले. काही वर्षांत त्यांच्या मार्गदर्शनाखाली आपल्या देशात हॉकी शिक्षक तयार केले. या सोव्हिएत शिक्षकांनी अधिक शिक्षक तयार करावे, त्यांनी अधिक शिक्षक तयार करावेत व त्या पद्धतीने १९८०च्या सुमारास सोविएत यूनियनमध्ये अर्धा लाखपर्यंत तरुण शालेय व महाविद्यालयीन विद्यार्थी रोज नियमाने

हॉकीचा सराव व अभ्यास करीत असतील अशी ही त्यांची तयारीची योजना होती. याचा अर्थ असा की शास्त्रशुद्ध व सतत हॉकीचे शिक्षण घेणारे हजारो खेळाडू वीस-बावीस वर्षांत तयार करावेत व मगच आंतरराष्ट्रीय स्पर्धेत सहभागी व्हावे अशी ही सोविएत यूनियनची क्रीडाक्षेत्रातील एकूण व्यवस्था होती. याउलट भारतात तेव्हापासून जवळजवळ आतापर्यंत, आधी कळस व मग पाया रे, या उलटया गंगेच्या प्रकाराने क्रीडाक्षेत्रात यश मिळविण्याची झटपट रंगारी धडपड दिसते.

भारताच्या क्रीडाव्यवस्थेत दुसरा एक दोष आढळतो तो असा की, खेळाडूंचे प्रत्यक्ष पद्धतशीर, नियमाने सतत शिक्षण हे सर्व देशभर चालविण्याऐवजी मुख्यतः लष्करात आणि काही अगदी थोडया महाविद्यालयांतूनच मात्र ते आढळते. त्यामुळे चुकीच्या पद्धतीने खेळायच्या सवयी लागलेले असे खेळाडू प्रशिक्षणास उपलब्ध होतात. त्यांच्या त्या चुकीच्या सवयी काढून टाकून त्यांना शास्त्रशुद्ध खेळायला शिकविणे स्वाभाविकच अत्यंत कठीण होते. अनेक तज्ज्ञ माहितगारांशी वेळोवेळी झालेल्या संवादावरून त्यांच्यात एका गोष्टीबद्दल पूर्ण सहमत आढळले. अगदी प्राथमिक शाळेतच मुलांमुलींना विविध क्रीडाप्रकारांचे, खेळांचे शास्त्रशुद्ध शिक्षण देण्याची सोय होऊन त्या सोयीचा फायदा लाखो मुलांमुलींना मिळाला तरच त्यातून आंतरराष्ट्रीय दर्जाचे खेळाडू निर्माण होऊ शकतील, असे हे एकमत होय.

तसे पाहिले तर हे मत नव्याने प्रतिपादले जात आहे अशातला भाग नाही. प्रांतिक स्वायत्ततेच्या कालापासून या मताला कागदोपत्री, समित्यांच्या अहवालातून पाठिंबा आढळतो. उदाहरणार्थ, त्या वेळच्या मुंबई प्रांताच्या पहिल्या खेर मंत्रिमंडळाने स्वामी कुवलयानंद यांच्या अध्यक्षतेखाली १९३७ साली नेमलेल्या शारीरिक शिक्षण समितीने आपल्या अहवालात ज्या शिफारशी केल्या आहेत त्याही शाळांतूनच शारीरिक शिक्षणास, क्रीडाशिक्षणास महत्त्व देण्याच्या तत्त्वावर आधारलेल्या आहेत. पण दुर्दैवाची गोष्ट अशी की, त्या समितीच्या शिफारशींची आजही म्हणावी तशी अंमलबजावणी झालेली नाही. प्रत्येक प्राथमिक व दुय्यम शाळेस पुरेसे क्रीडांगण हवेच ही कुवलयानंद समितीची शिफारस स्वीकारली गेली. पण त्या नियमास जवळ जवळ प्रत्येकच शाळा अपवाद करण्यात आली. असे अपवाद करणे अजूनही चालूच आहे. शाळेतील मुलांना क्रीडांगणच नसेल तर ती खेळणार तरी कोठे आणि त्यातून चांगले खेळाडू निर्माण होणार तरी कसे ? त्यामुळे अखेर नवव्या आशियाई सामन्यांच्या निमित्ताने ह्या सामन्यांच्या बाबत होत असलेल्या चर्चेत पुनरपि प्रत्येक शाळेला क्रीडांगण असावे असे प्रतिपादन करण्याचा प्रसंग कायमच राहिला आहे.

भारतातील ऋतुचक्र लक्षात घेता साधारणपणे नैऋत्य मान्सूनचा पाऊस संपल्यानंतरचा म्हणजे हिवाळ्याचा काळ शारीरिक शिक्षण, क्रीडाशिक्षण या दोन्हीस योग्य होय. पण नेमक्या त्याच वेळी शालेय आणि महाविद्यालयीन वार्षिक परीक्षांचे वेध लागतात. परिणामी शैक्षणिक वर्षाच्या पहिल्या सहामाहीत पावसामुळे क्रीडाशिक्षण संभवत

नाही व दुसऱ्या सहामाहीत वार्षिक परीक्षेचे वेध लागल्यामुळे शारीरिक शिक्षणाकडे, क्रीडाशिक्षणाकडे पुरेसे लक्ष जात नाही. ही वस्तुस्थिती लक्षात घेऊन ती बदलण्याचे म्हणजेच शालेय व महाविद्यालयीन वार्षिक परीक्षा या मोसमी पावसाळा संपताच व क्रीडाशिक्षणास योग्य असा हिवाळा हे शालेय, महाविद्यालयीन वर्षाचे पहिले सत्र असे करण्याची शिफारस कुवलयानंद समितीने केली होती. हा बदल टप्प्याटप्प्याने कसा करावा हेही त्यांनी सुचविले. पण गेल्या ४५ वर्षांत त्या दृष्टीने काही हालचाल झालेलीच नाही असे म्हणणे वाजवी ठरणार आहे.

कुवलयानंद समितीच्या एका शिफारशीची तर जणू काही ठरवून केल्यासारखी थट्टा सर्वत्र झाली. या शिफारशीच्या अनुषंगाने शारीरिक शिक्षण सर्व शाळांतून सक्तीचे व्हावयाचे होते. कागदावर ते तसे झालेही. पण व्यवहारात ते असूनही नसल्यासारखेच होते. एकतर वैद्यकीय शिफारस, विद्यार्थी व विद्यार्थिनींनी लांब राहणे वगैरे कारणांनी या सक्तीपासून विद्यार्थ्यांना माफी देण्याची चाल आहे. शाळा अगर महाविद्यालये जितके दिवस भरतील तितके दिवसही शारीरिक शिक्षणाचे तास नसतात. महाविद्यालयातून तर सबंध वर्षात मिळून अदमासे ६०–६५ इतके दिवसच शारीरिक शिक्षणाचे तास होतात व त्यास अनुपस्थित राहिले असता वर्षाच्या शेवटी १०–२० रुपये दंड भरून मोकळे होता येते. हाच प्रकार बहुधा साऱ्या भारतभर या ना त्या प्रकारे चालू आहे. शारीरिक शिक्षण, व्यायाम ही एक दैनंदिन शिस्त आहे हे विसरून शिक्षण संस्थातील शारीरिक शिक्षण या "सक्तीच्या" विषयाची अशी हेळसांड झाल्यानंतर विद्यार्थी, विद्यार्थिनी यांच्या मनात शारीरिक शिक्षणाबद्दल उपजत असलेली आवड नाहीशी होऊन त्या जागी शारीरिक शिक्षण, व्यायाम किंबहुना एकूण क्रीडांगण यांबद्दल जर अनादर निर्माण झाला तर त्यांना दोष देण्याऐवजी, त्यांच्यात हा अनैसर्गिक बदल घडवून आणणाऱ्या शिक्षणव्यवस्थेसच व शिक्षकांसही दोष द्यावयास हवा.

शिक्षकांस दोष द्यावयास हवा असे म्हणण्यास भरपूर वाव आहे. जी मंडळी स्वतःच्या विद्यार्थिदशेत वा युवावस्थेत स्वतः नियमाने कोणताच खेळ खेळत नव्हती, व्यायाम करीत नव्हती अशी मंडळी चार–सहा महिने वा फार तर वर्षभर एखाद्या संस्थेत दाखल होऊन शारीरिक शिक्षण-शिक्षक म्हणून बाहेर येऊ शकतात. स्वाभाविकच ते विद्यार्थि–विद्यार्थिनींना क्रीडा–कौशल्य तर सोडाच पण साधे व्यायामही नीट शिकवू शकत नाहीत. खोटी नाणी खऱ्या नाण्यास नाणेबाजारातून बाहेर फेकतात. तद्वतच हे नकली शारीरिक शिक्षण-शिक्षक चांगल्या व्यायामपटूंना, खेळाडूंना, व्यायाम-शिक्षकांना, क्रीडाशिक्षकांना शैक्षणिक जगतातून पिटाळून लावतात असा गेल्या ४० वर्षांत अनुभव आलेला आहे. ज्या कोणास पुढे शाळेत वा महाविद्यालयांत शारीरिक शिक्षण-शिक्षक व्हावयाचे आहे वा क्रीडा-शिक्षक व्हावयाचे आहे त्यास शिक्षक होण्याच्या अभ्यासक्रमास प्रवेश देण्यापूर्वी, तो त्यापूर्वी स्वतः या ना त्या खेळात निदान आंतरमहाविद्या-

लयीन दर्जाच्या सामन्यांत, स्पर्धांत सहभागी होत असे ना याची खात्री करून घेतली पाहिजे. ज्याचा त्याच्या बाल्यावस्थेपासून क्रीडांगणाशी आपुलकीचा संबंध नाही असा माणूस पंचविशीत गेल्यानंतर ठाकून–ठोकून त्याचा क्रीडाशिक्षक बनविणे आणि रेडयाचे दूध काढणे यात काही फरक नाही. शाळा–महाविद्यालयात शारीरिक शिक्षणाची दुरवस्था तर आहेच पण क्रीडाविभागांची याहूनही अधिक वाईट स्थिती आहे. पुणे, मुंबई, नागपूर अशा मोठ्या शहरांतील महाविद्यालयांना अद्ययावत उपकरणांच्या व्यायामशाळा (जिमनॅशियम्स) नाहीत. या महाविद्यालयातील विद्यार्थी रोज काही ना काही खेळ खेळावयाचे म्हणतील तर साऱ्या तर सोडाच पण निम्म्या विद्यार्थ्यांनाही पुरतील एवढी क्रीडांगणे महाविद्यालयांजवळ नाहीत, शाळांजवळही नाहीत. आहेत त्या क्रीडांगणांची निगा राखली जाते असे म्हणणेही कठीण आहे. अशी स्थिती असता म्हणजे देशातील बालक-बालिका व युवक-युवती यांच्या शारीरिक शिक्षणाची, क्रीडाविकासाची काही म्हणण्याजोगी पद्धतशीर सोयच नसता खेळाडू निर्माण व्हावे कोठून ?

स्वातंत्र्यानंतर ३५ वर्षांनीही अशी दुरवस्था येण्याचे कारण शोधू जाता असे दिसते की, आपल्या राष्ट्रास क्रीडाविषयक धोरणच नसल्याने त्या क्षेत्रात कोणीही काहीही करावे व त्याला कोणत्याही प्रकारचे धोरणात्मक बंधनच नसावे असे अराजक माजले आहे. कुवलयानंद समितीपासून आजपर्यंत निर्माण झालेल्या राजकुमारी अमृत कौर क्रीडा प्रशिक्षण योजना, नंतरची भारतीय पातळीवरची आणि राज्य पातळीवरची क्रीडा-मंडळे, त्यांचे अहवाल या साऱ्यांतून केवळ देशाच्या क्रीडाविषयक आकांक्षा व्यक्त केल्या जातात. पण त्या साधाव्या कशा याचा ठाम आराखडा सापडत नाही. याचे कारण क्रीडा-प्रयत्नांची दिशा, त्यामागील विचार हे कोठेही ठामपणे कागदोपत्री दाखल नाही. भारतीय ऑलिंपिक मंडळाचे संस्थापक ज्याअर्थी केवळ चार महिन्यांत दहा हजार सदस्य नोंदवतात त्या अर्थी देशात ऑलिंपिक चळवळ, क्रीडाचळवळ ही व्यापक, आमजनतेची, सर्व नागरिकांची व्हावी असा त्यांचा हेतू दिसतो. १९५१मध्ये पहिल्या आशियाई क्रीडास्पर्धांना पंडितजींनी दिलेला संदेश या सामन्यांची उद्दिष्टे अधिक स्पष्ट करतो. या ना त्या संघाने वा खेळाडूने जिंकणे एवढाच क्रीडास्पर्धांचा हेतू नसून राष्ट्रातील सर्व नागरिकांचे व विशेषतः युवक-युवतींचे आरोग्य सुदृढ व्हावे हा क्रीडास्पर्धांचा हेतू भारताचे पहिले पंतप्रधान सांगतात. याचाच अर्थ राष्ट्रीय क्रीडा-प्रयत्न हे प्रचंड व्यापक प्रमाणावर व सर्व नागरिकांच्यासाठी आणि सर्व नागरिकांकडून व्हावेत असा फार व्यापक दृष्टिकोण पंडितजी सांगून गेले आहेत. भारतीय ऑलिंपिक मंडळाचे संस्थापक व पंडित नेहरू या दोघांनीही सांगितलेले हे उद्देश लक्षात ठेवून देशाचे क्रीडा विषयक राष्ट्रीय धोरण निश्चित करणे कठीण असू नये. तरीही ते अद्याप घडलेले नाही हेही तितकेच खरे.

राष्ट्रीय क्रीडा-धोरण मुक्रर केले असता राष्ट्राच्या क्रीडांगणावरील प्रयत्नास, मेहनतीस एक ठाम दिशा तर प्राप्त होईलच, पण देशास परवडण्याजोगा असा कालबद्ध

कार्यक्रम ठरविणेही शक्य होईल. एकदम साऱ्याच खेळांना हात घालणे देशास आज तरी परवडणार नाही हे उघड आहे. पण एकदा राष्ट्रीय धोरण ठरले म्हणजे राष्ट्राच्या सार्वजनिक खजिन्यातून, राष्ट्राच्या अन्य कुवतीतून प्रथम कोणत्या खेळांना, क्रीडाप्रकारांना कसकसे उत्तेजन द्यावे हे ठरविता येईल. असे काही ठरविणे अगत्याचे आहे. नाही तर टेनिस, गोल्फ, बॅडमिंटन असे देशातील दोन-तीन टक्के लोकांनाही परवडू न शकणारे खेळ आणि ॲथलेटिक्स, भारतीय पद्धतीचे का होईना जिम्नॅस्टिक्स असे मूलभूत स्वरूपाचे व सामान्य नागरिकासही परवडण्याजोगे खेळ या दोन्हीकडे सारख्याच दृष्टीने पाहिले जाऊन त्यावर सारखाच खर्च केला जाण्याचा धोका उभा राहील; किंबहुना राहिला आहे. सरंजामशाही, साम्राज्यशाही युग संपल्यानंतर म्हणजेच आधुनिक औद्योगिक युगात व तज्जन्य समाजरचना निर्माण झाल्यानंतर पुढे आलेला कोणताही देश जो एक खेळ खेळत नाही व म्हणून जगातील केवळ पाच-सातच देशांत खेळला जातो तो क्रिकेट या नावाचा एक कालाचा अपव्यय करणारा व म्हणून कोणाही राष्ट्रास व विशेषतः विकसनशील, गरीब राष्ट्रास न परवडणारा खेळ क्रीडाक्षेत्राच्या डोक्यावर बसविण्याचा प्रयत्न काही हितसंबंधी करीत असतात. पुण्या-मुंबईसारख्या ठिकाणी शाळा–महाविद्यालयांना क्रीडांगणे नाहीत. गावात धावण्या-पळण्याची सोय असलेली क्रीडांगणे नाहीत, असलेल्या तालमी एखाद्या रस्ता-रुंदीसारख्या कारणाने आकुंचित होत आहेत आणि तरीही क्रिकेटसाठी आणि केवळ क्रिकेटलाच उपयोगी पडतील असे स्टेडियम बांधले जात आहेत. विंबल्डन येथे भरणारे टेनिस या नावाच्या खेळाचे धंदेवाईक खेळाडूंनाही खुले असणारे सामने भारतीय प्रेक्षकांपर्यंत पोहोचविण्यास "दूरदर्शन"ला सवड व पैसा आहे. पण राष्ट्रीय हॉकी स्पर्धा वा राष्ट्रीय तैराकी, ॲथलेटिक्स, जिम्नॅस्टिक्स हे वेळच्या वेळी व पूर्णतः दाखविण्यास दूरदर्शनला सवड होत नाही. मग आंतर-विद्यापीठ क्रीडास्पर्धा ते थोडेच प्रक्षेपित करणार? वस्तुतः सर्वसामान्य जनांस परवडण्याजोगे आणि पैसा, क्रीडांगण या साऱ्या दृष्टीने सार्वजनिक संस्थांना परवडणारे असे जे खेळ आहेत त्यांतील कौशल्याचे, विविध प्रकारचे शिक्षण देण्यास "दूरदर्शन"सारखे माध्यम वापरता येईल. पण त्याऐवजी "दूरदर्शन"चे क्रीडाप्रेम केवळ श्रीमंतांना प्रिय असणाऱ्या व देशास न परवडणाऱ्या खेळांना प्रसिद्धी देण्यातच व्यतीत होते. या बाबतीत वृत्तपत्रेही तशीच दिसतात. भारतातील राज्यातील आंतरजिल्हा स्पर्धांपेक्षा कितीतरी जास्त जागा ते इंग्लंडातील आंतरपरगणा क्रिकेटला वाहून टाकतात. भारतीय भाषांतील वृत्तपत्रांपैकी काही, थोडे अपवाद सोडता, इतरांना तर क्रीडाखाते, क्रीडावृत्तसंपादक वगैरे काहीही नाही! या साऱ्याचे कारण असे की राष्ट्राच्या प्रगतीसाठी जो सर्वांगीण प्रयत्न चालू आहे त्यामध्ये क्रीडाक्षेत्राचे नेमके स्थान काय, त्याचे नेमके कर्तव्य काय, हे निश्चित झालेले नाही. राष्ट्रीय क्रीडाधोरण राष्ट्राने म्हणजे संसदेने निश्चित केल्यावाचून ही स्थिती बदलण्यास वैचारिक बैठकच उपलब्ध होणार नाही.

नवव्या आशियाई क्रीडास्पर्धांमुळे जे काही वाद, चर्चा सुरू झाल्या त्यांमध्ये अनेक ठिकाणी अनेक माहितगार कार्यकर्त्यांनी एक तक्रार ठामपणे केली. ती अशी की, विविध खेळांच्या ज्या राष्ट्रीय संघटना आहेत त्या साऱ्याच आपापल्या कर्तव्यात म्हणजे आंतरराष्ट्रीय दर्जाचे खेळाडू तयार करण्याच्या बाबतीत पूर्णतः अयशस्वी ठरल्या आहेत. ही तक्रार खोटी आहे असे म्हणण्यासही फारसे कोणी धजावले नाही. राष्ट्रीय संघटनांची अशी स्थिती का व्हावी, हा खरा प्रश्न आहे. गेल्या ३०।४० वर्षांत या संघटनांचे नेतृत्व ज्या व्यक्तींनी केले त्यांपैकी काही अतज्ज्ञ, स्वार्थी अशा होत्याही. पण त्याबरोबरच क्रीडाक्षेत्राची सेवा हेच आपले जीवन कर्तव्य मानणाऱ्या अशाही अनेक व्यक्ती या संघटनांत, त्यांच्या राज्य शाखांत, जिल्हा शाखांत होत्या हेही विसरून चालणार नाही. अशा चांगल्या व्यक्तींच्या कार्यालाही त्यांना अपेक्षित इतके यश येऊ नये असे का व्हावे ? याचे एक कारण असे दिसते की, या साऱ्या कार्यकर्त्यांच्या दृष्टीसमोर काहीएक, शास्त्रशुद्ध पद्धतीने ठरलेला असा राष्ट्रव्यापी कार्यक्रम नव्हता. त्यामुळे या राष्ट्रीय क्रीडा-संघटनांतील चांगल्या कार्यकर्त्यांचा, सद्हेतूने केलेला प्रयत्नही दिशाहीन ठरला. परिणामी, एकदा वापरलेली म्हण पुन्हा वापरायची तर, खोटी नाणी खऱ्या नाण्यास नाणे-बाजारातून पिटाळून लावतात, तसेच चांगले कार्यकर्ते सम्यक् धोरणा-अभावी कुंठित झाल्याने संधिसाधू, स्वार्थसाधू मंडळींचे फावावे अशी स्थिती निर्माण झाली. म्हणजे राष्ट्रीय क्रीडा-संघटना आणि त्यांच्या राज्य शाखा, जिल्हा शाखा, तालुका शाखा अपेक्षेप्रमाणे कार्य करावयास हव्या असतील तर या सर्वांच्यापुढे एक ठाम राष्ट्रीय क्रीडाधोरण आणि राष्ट्रीय क्रीडा-कार्यक्रम असावयास हवा.

क्रीडाक्षेत्राचे राष्ट्रीय जीवनातील महत्त्व वारंवार सांगितले जाते. किंबहुना ते वारंवार सांगितले गेल्यामुळेच त्याबद्दल 'अतिपरिचयात् अवज्ञा' अशी काहीशी स्थिती होऊन बसते. पण गेल्या सात-आठ दशकांत ऑलिंपिक सामन्यांत कोणत्या देशाने कसकसे विजय मिळवले, त्यामागे त्यांच्या प्रयत्नांचे वैशिष्ट्य काय होते असे पाहिले असता ऑलिंपिकमधील यश आणि त्या त्या राष्ट्रांचे त्या त्या वेळचे सर्वांगीण, सम्यक् विकासयत्नांतील यश यांचे अतूट नाते असावे असे दिसते. हे स्वाभाविकच होय, कारण क्रीडांगणावरील यशासाठी, त्याच्या तयारीसाठी बरीच शास्त्रीय, वैज्ञानिक आणि संघट-नात्मक प्रगती, सिद्धता असावी लागते. हे लक्षात घेता क्रीडाक्षेत्र हे केवळ लहान मुलांनी बागडण्यासाठी वा प्रौढांनी एक गंमत, करमणूक म्हणून पाहण्याची चीज ठरू नये. राष्ट्राच्या सर्वांगीण विकासाचा एक अविभाज्य भाग किंबहुना त्या विकासास आवश्यक असा अविभाज्य भाग म्हणून क्रीडाक्षेत्राकडे पाहावयास हवे. आधुनिक जगात तसे पाहिले जातेही. सोविएत यूनियनमध्ये नागरिकांसाठी ज्या सुविधा पुरविणे शासन-संस्थेवर बंधनकारक आहे त्यांमध्ये क्रीडा-सुविधांचा समावेश आहे. त्याचे अनुकरण अन्य काही प्रगतिशील राष्ट्रांनी केले आहे. चीनमध्ये कारखान्यांतूनच शारीरिक शिक्षणाची, क्रीडांगणांची व्यवस्था केली जाते. आधुनिक भारताने क्रीडाक्षेत्राच्या

विकासात मागे पडून चालणार नाही. हे लक्षात घेता राष्ट्रीय क्रीडा-धोरण ठरविणे ही कोणा खेळाडूवर उपकार करण्याची बाब वा शिळोप्याच्या फावल्या वेळात करण्याचे काम असे मानता कामा नये. म्हणूनच संसदेने धोरणनामा स्वीकारून वा ठराव करून जसे राष्ट्रीय औद्योगिक धोरण ठरविले तसेच संसदेने क्रीडा-धोरण ठरविले पाहिजे आणि त्यानंतर केंद्रीय व राज्य सरकारे, त्याचप्रमाणे जिल्हा परिषद, ग्रामपंचायत वगैरे विकेंद्रित सत्तास्थाने आणि सार्वजनिक क्षेत्रातील सर्व संस्था यांनी त्या राष्ट्रीय धोरणानुसार आपआपले क्रीडा कार्यक्रम, क्रीडा-सहायाचे कार्यक्रम वगैरे ठरविले पाहिजेत व अमलात आणले पाहिजेत. तसे झाल्यासच मात्र केवळ श्रीमंतांना आवडणाऱ्या खेळांचे क्रीडाक्षेत्रावर वर्चस्व, त्याला सार्वजनिक माध्यम साधनांचा पाठिंबा वगैरे आज दिसणाऱ्या विकृती नाहीशा होऊ शकून देशातील क्रीडाक्षेत्र पहिले पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू यांनी १९५१मध्ये अपेक्षिल्याप्रमाणे उपयुक्त ठरू शकेल.

राष्ट्रीय क्रीडाधोरणाच्या अभावी विविध खेळांच्या राष्ट्रीय संघटना सर्वस्वी दुर्बल व अकार्यक्षम झालेल्या दिसतात. वस्तुतः आशियाई क्रीडास्पर्धांची व्यवस्था, त्यासाठी लागणारे पंच, वेळाधिकारी वगैरे विशेषज्ञ आणि शेकडो स्वयंसेवक तयार करणे, संघटित करणे वगैरे सारे या संघटनांनी आपण होऊन करावयास हवे. त्याऐवजी सरकारने अनौपचारिक का होईना पण हस्तक्षेप करून त्यासाठी नेमलेल्या समित्यांना हे करावे लागले आणि त्यासाठी सैन्यदलाची व त्याचे मार्गदर्शन असलेल्या एन. सी. सी.-सारख्या दलांची मदत घ्यावी लागली आहे. खेळाच्या राष्ट्रीय संघटनांचे दौर्बल्य एवढ्यावरच थांबले नाही, तर आशियाई स्पर्धांत भाग घेणाऱ्या भारतीय खेळाडूंची, संघांची प्रशिक्षणाची शिबिरे भरविण्यातही आशियाई स्पर्धांसाठी असलेल्या समितीस पुढाकार घ्यावा लागला आहे. राष्ट्रीय क्रीडा-संघटना अशा दुबळ्या असण्याचे एक कारण म्हणजे त्यांच्या राज्य शाखा, जिल्हा शाखा, शहर शाखा, तालुका शाखा अशा सुसूत्र व सतत कार्यरत असलेल्या संघटनाच उभ्या राहिल्या नाहीत. हे पाहता राष्ट्रीय क्रीडाधोरणाची व त्याच्या अंमलबजावणीची गरज प्रकर्षाने जाणवते.

संसद-सदस्यांच्या क्रीडामंचाने अलीकडेच पुढाकार घेऊन राष्ट्रीय क्रीडा-धोरण शक्य तो तातडीने ठरविण्याचे आवाहन सरकारला केले आहे. त्याचा पाठपुरावा संसद-सदस्य हिरीरीने करीत राहतील तर त्यांना यश येणे अवघड ठरू नये.

राष्ट्रीय क्रीडाधोरण ठरणे वगैरे काहीसे गुंतागुंतीचे व म्हणून किचकट काम चालू असताच, त्याला चालना मिळत असताच दुसरे एक काम सर्व शहरांतून, गावांतून सामान्य नागरिकांनी हातात घेण्याची आवश्यकता आहे. आजही शाळांना, महाविद्यालयांना तर सोडाच पण एकूण गावांना, शहरांना क्रीडांगणे नाहीत, अशी स्थिती आहे. मुला-मुलींना, युवकांना खेळण्यासाठी तर क्रीडांगणे हवीच, पण अन्य नागरिकांनाही काही नाही तरी साधे फिरावयास जाण्याचा व्यायाम घेण्यासाठी क्रीडांगणे हवीच. बसेस, ट्रक्स इत्यादी वाहनांमुळे हवेत प्रदूषण होत असता ते कमी करण्यासाठी मोकळ्या जागा

शहरात, गावात विशेषतः मोठया गजबजलेल्या शहरात असावयास हव्यात. आज त्या आढळत नाहीत. ठिकठिकाणी छोटी छोटी क्रीडांगणे झाली असता ही उणीव भरून निघू शकेल. त्यासाठी नागरिकांनीही, विशेषतः क्रीडाप्रेमी, व्यायामप्रेमी आणि प्रदूषण-प्रतिबंधक मोहिमेत रस असलेल्या नागरिकांनी, नगरपालिका, महानगरपालिका वगैरे स्थानिक स्वराज्य संस्थांवर दडपण आणून ठिकठिकाणी क्रीडांगणे, निदान मोकळ्या जागा, अंगणे ठेवण्याची, राखण्याची जबाबदारी या स्थानिक संस्थांकडून पार पाडून घ्यावयास हवी. हे काम राजकारणातील किंबहुना सर्व मतभेदांच्या अतीत असे आहे. ते उभारीने करण्याची एक मोहीम आखावयास हवी.

नवव्या आशियाई क्रीडास्पर्धा भारताच्या राजधानीत भरल्याने क्रीडा, खेळ या जीवनाच्या आवश्यक अंगाबद्दल ज्ञान होणे जरी नाही तरी एक उत्साहाची लाट उसळणे स्वाभाविक आहे. त्या उत्साहाचे स्वरूप तेरड्याचा रंग तीन दिवस असे फसवे ठरावयास नको असेल तर राष्ट्रीय क्रीडा-धोरण व कालबद्ध राष्ट्रीय क्रीडा–विकास कार्यक्रम ठरविणे राष्ट्रनेत्यांना, समाजनेत्यांना भाग पाडण्यास आणि ठिकठिकाणी मोकळ्या जागा, अंगणे, क्रीडांगणे राखण्यासाठी दडपण स्थानिक स्वराज्य संस्थांवर आणण्यासाठी, अशा दोन जन–चळवळी सुरू व्हावयास हव्यात. त्या तशा झाल्या तरीही नवव्या आशियाई क्रीडा स्पर्धा आपल्या देशात भरविण्याच्या खटाटोपाला इष्ट ते फल आले असे होईल.

हे इष्ट फल मिळवलेच पाहिजे ते केवळ काही आंतरराष्ट्रीय स्पर्धांत विजय मिळविण्यासाठी नव्हे तर सम्यक् जीवन–विकासाचा एक अभेद्य भाग म्हणूनच. व्यायाम, खेळ यांमुळे प्रकृती चांगली राहून आजारी पडण्याची शक्यता कमी होते आणि आजारी पडले असता पुन्हा पूर्ववत होण्याचा काळ कमी होतो. त्यामुळे आजारी-पणामुळे काम झाले नाही असे होण्याची शक्यता कमी होते. विकसनशील देशांत किंबहुना कोणत्याही देशात कामगारांच्या, कर्मचाऱ्यांच्या आजारीपणामुळे काम कमी होणे, उत्पादन कमी होणे कधीच परवडणारे नसते. हे लक्षात घेता जनतेतील, तिच्या सर्व विभागांतील आजारपण कमी होणे ही राष्ट्रीय गरज होय. हे ओळखूनच आजार-पण–प्रतिबंधक ( प्रिव्हेंटिव्ह ) वैद्यकास राष्ट्रीय वैद्यक योजनेत खास स्थान दिले जाते. व्यायाम, खेळ यांच्याकडेही आजारपण–प्रतिबंधक वैद्यकाचा एक नैसर्गिक व म्हणून त्यातल्या त्यात सोपा, स्वस्त व अधिक खात्रीचा मार्ग म्हणून पाहिले जाते. याचाच अर्थ असा की आम जनतेला, प्रत्येक नागरिकाला, स्त्री-पुरुषाला व्यायामाची, खेळाची संधी देणे, त्यासाठी आवश्यक त्या सुविधा उपलब्ध करून देणे यामध्ये क्रीडाप्रेमीयांइतकाच आरोग्य मंत्रालयास किंबहुना एकूण सरकारास रस असावयास हवा. भारत सरकारास हा विचार तत्त्वतः तरी संमत असावासे दिसते, कारण एरवी त्यात स्वतंत्र "क्रीडा मंत्रालय" सप्टेंबर १९८२ च्या प्रारंभी निर्माण केले गेले ते केले गेले नसते.

मजबूत शरीरात खंबीर मन, ही म्हण अनेक दृष्टींनी मार्गदर्शक ठरावी. शरीर

मजबूत असेल तर माणसाचा आत्मविश्वास वाढतो. किंबहुना ' लाथ मारीन तिथे पाणी काढीन ' अशी रग त्याच्या मनात निर्माण होते ही रग हाच प्रयत्नवादाचा आधारस्तंभ असतो. विकसनशील देशांत, ज्या देशाला प्रयत्नांची पराकाष्ठा करून प्रगत देशांच्या बरोबरीस याव्याचे आहे, पुढे जावयाचे आहे अशा देशास अशी रग प्रत्येक नागरिकाच्या ठिकाणी असणे आवश्यकच होय. भारत हा देश अन्य परतंत्र देशांप्रमाणे त्याच्या पारतंत्र्याच्या काळात सर्वार्थाने मागे पडला. हा मागासपणा काढून टाकून प्रगती साधावयाची तर, प्रयत्नवादास एक विलक्षण स्थान भारतीय जनतेत असावयास हवे. त्यासाठी आत्मविश्वास निर्माण व्हावा म्हणूनही, मजबूत शरीरात खंबीर मन, या म्हणीचाच अवलंब करावयास हवा. त्यामुळे सर्व नागरिकांस व्यायामाच्या, खेळाच्या सुविधा पुरविण्यास नियोजन मंत्रालयास किंबहुना उत्पादकता वाढीत रस असलेल्या सर्वच मंत्रालयांना रस असावयास हवा.

क्रीडास्पर्धा हा व्यायामाचा, क्रीडासरावाचा, अभ्यासाचा एक मनोरंजक असा अविभाज्य भाग होय. स्पर्धा म्हटली की कधी यश व कधी अपयश या दोन्हींचीही मनात तयारी ठेवावी लागते. प्रतिस्पर्धी चांगला खेळला, त्याने अधिक वा अधिक पद्धतशीर सराव केला असल्याने त्याची तयारी चांगली होती व म्हणून तो जिंकला, तर त्यामुळे आपण हरल्याचे दुःख करीत, जेत्याच्या नावाने बोटे मोडीत बसण्यापेक्षा प्रतिस्पर्ध्याच्या गुणांचे, कर्तृत्वाचे कौतुक करून त्या प्रतिस्पर्ध्यापासून शिकण्याची प्रवृत्ती केवळ स्पर्धेतून आणि विशेषतः क्रीडास्पर्धेतूनच निर्माण होऊ शकते. ही प्रवृत्ती ही निरोगी, सुसंस्कृत मनाचे लक्षण होय. असे मन सामूहिक कार्यात अत्यंत उपयुक्त असते. त्यामुळे राष्ट्राचा मानसिक, सांस्कृतिक विकास करण्याची जबाबदारी स्वीकारलेल्या शिक्षण मंत्रालयास क्रीडास्पर्धांना उत्तेजन देण्यात खास रस असावयास हवा.

अशाप्रकारे एकूण सरकारने म्हणजेच ते प्रतिनिधित्व करीत असलेल्या एकूण समाजानेच व्यायाम, खेळ, क्रीडाप्रकार यांच्या विकासास प्रोत्साहन देणे हे आपले कर्तव्यच मानावयास हवे. हे कर्तव्य पार पाडावयाचे तर त्याची कक्षा केवळ मूठभर श्रीमंत, सुखवस्तू अशा लोकांपुरती वा नागरी स्त्री-पुरुषांपुरती मर्यादित ठेवून चालणार नाही हे उघड आहे. भारतात तर सत्तर टक्के नागरिक ग्रामीण भागात, खेडोपाडी, डोंगरी भागात राहणारे आहेत. त्यांच्यासाठीही व्यायामाची, खेळाची शास्त्रशुद्ध व पद्धतशीर संघटित अशी सेवा–सुविधा उपलब्ध असली पाहिजे. सत्तावीस मैलांच्या म्हणजे मॅरेथॉन स्पर्धेत वा डोंगर–दऱ्यांतून धावण्याच्या ( क्रॉसकंट्री ) स्पर्धेत शहरातील सुखवस्तू युवकांहून काटक शेतकरी, आदिवासी अधिक चांगले पराक्रम करू शकतील असे मानावयास विविध देशांतील आणि भारतातील क्रीडेतिहास सांगतो. १९२०च्या अँटवर्प येथील ऑलिंपिक स्पर्धेमध्ये मॅरेथॉन शर्यतीत एकोणिसावे आलेले आणि इंग्लंडात १० मैली शर्यतीतून त्या वेळी नावलौकिक मिळविलेले श्री. चौगुले हे ग्रामीण भागातीलच होते. मोठ्या नद्यांकाठीचे वा सागरकिनारीचे लोक त्यांना नीट शिकविल्यास चांगले

पोहणारे होऊ शकतील. १९८२च्या ब्रिस्बेन येथील राष्ट्रकुल क्रीडास्पर्धांत भारतास मिळालेल्या पाच सुवर्णपदकांपैकी चार व एकूण पदकांपैकी बहुतांश कुस्तीत मिळाली. यावरूनही जो खेळ या ना त्या रूपात पण सर्वत्र, खेडोपाडी, कड्याकपारी पिढ्यान्‌पिढ्या खेळला गेला त्यातच यश त्यातल्या त्यात अधिक सुलभ असल्याचेच सिद्ध होते.

व्यायाम, कसरतीचे व्यायाम, मैदानी खेळ यांचे सर्वांगीण महत्त्व लक्षात घेता त्याच्या संबंधाने ठाम राष्ट्रीय धोरण आणि निश्चित कालबद्ध कार्यक्रम असणे किती अगत्याचे आहे हे अधिक विस्ताराने सांगण्याची गरज नसावी.

राष्ट्रीय क्रीडाधोरण काहीही असले, कार्यक्रम कोणताही ठरला, तरी त्याच्या अंमलबजावणीसाठी क्रीडांगणे लागणारच. मुंबई, कलकत्ता, मद्रास ही तर सोडाच पण पुणे, हैदराबाद, कानपूर, लखनौ वगैरे शहरांचीही आजची अवस्था अशी आहे की तेथे आता मोकळ्या जागा सापडणेच कठीण आहे.

अशीच अवस्था हळूहळू अनेक जिल्ह्यांच्या केंद्रस्थानांचीही होण्याचा धोका दिसतो, किंबहुना तशी धोकादायक प्रक्रिया हळूहळू पण निश्चितपणे चालू झालीही आहे. पण तहशील ठाणी वा त्यापेक्षा छोट्या गावांत वा ज्या गावाजवळ मोकळ्या जागा अद्याप आहेत, तेथील त्या जागा वेळीच ताब्यात घेऊन त्यांचे रूपांतर क्रीडांगणात व्हावयास हवे. निदान त्या जागा क्रीडांगण, व्यायामशाळा यासाठी राखून ठेवण्याची व्यवस्था तरी आताच व्हावयास हवी. नव्या औद्योगिक वसाहती, नवी गावठाणे, नवी उपनगरे वगैरे आखले जात असता मोकळ्या जागा, क्रीडांगणे याचे हे महत्त्व कटाक्षाने ध्यानात ठेवले पाहिजे.

भारत हा एवढा प्रचंड देश आहे की, त्यामध्ये एखादा छोटासा उपक्रम, कार्यक्रम हाती घ्यावयाचे म्हटले तरी त्यासाठी खूपच रकमेची तरतूद असावी लागते. ही वस्तुस्थिती लक्षात ठेवून राष्ट्रीय क्रीडा कार्यक्रम आखताना कमीत कमी खर्चात जास्तीत जास्त नागरिकांना व्यायाम व क्रीडानंद कोणत्या क्रीडा-प्रकारांमुळे घेता येऊ शकेल हे ठरवून, तसतसे अग्रक्रम ठरवून कार्यक्रम आखावयास हवा. त्याचप्रमाणे पुढे कोणतेही खेळ खेळावयाचे झाले तरी त्या खेळाडूस शारीर-सामर्थ्य ( स्ट्रेंग्थ ), चापल्य, अचूक पदन्यास ( फुटवर्क ) हे गुण असावेच लागतात. हे लक्षात ठेवून आणि उपरोक्त खर्च व कार्यक्रम यांचे संबंध ध्यानी घेऊन देशभर, शहरात, छोट्या शहरात, खेडोपाडी आणि नव्या वसाहतीतही ॲथलेटिक्स आणि प्रथम भारतीय परंपरेचे व नंतर आधुनिक सर्वांगीण व्यायाम-पद्धतीच्या ( Gymnastics ) सोयी-सुविधा प्रथम केल्या पाहिजेत.

अग्रक्रमादी कार्यक्रमाच्या तपशिलात विस्ताराने न जाता एवढे ठामपणे म्हणता येईल की, राष्ट्रीय क्रीडाधोरण व कालबद्ध कार्यक्रम निश्चित ठरवून त्याची नागरी व ग्रामीण भागात व त्यातील सर्व जनविभागांसाठी अंमलबजावणी व्हावयास हवी. इतका डोळसपणा जर नवव्या आशियाई क्रीडास्पर्धांच्या निमित्ताने निर्माण झालेल्या उत्साहास प्राप्त झाला, तर ह्या क्रीडास्पर्धा हा एक सोहळा न ठरता एक राष्ट्रोपयोगी उपक्रम

ठरल्यावाचून राहणार नाही. 'केल्याने होत आहे रे, परी केलेचि पाहिजे' हा बोध ध्यानी ठेवावयास हवा. त्या दृष्टीने राष्ट्रात सुरू होणाऱ्या विचारास, कार्यास चालना देणे ही महाराष्ट्राची त्यातल्या त्यात पुणेकरांची एक विशेष जबाबदारी ठरावी. भारत ऑलिंपिक मंडळाची स्थापना पुण्यात झाली. तद्वतच संघटित शारीरिक शिक्षणाची चळवळ, अखिल महाराष्ट्र शारीरिक शिक्षण मंडळ पुण्यात जन्मास आले. आणि १९२८मध्ये पहिली अखिल महाराष्ट्र शारीरिक शिक्षण परिषद व त्यानंतर एकवीस वर्षांनी पहिली अखिल भारतीय शारीरिक शिक्षण परिषदही पुण्यात भरली. यामुळेच केवळ पुणेकरांची, महाराष्ट्राची जबाबदारी वाढते असे नाही तर पुण्याने केवळ मल्लखांब हा एक उत्तम व्यायाम-प्रकारच नव्हे तर नेत्रदीपक कसरतीचा क्रीडाप्रकार भारतास दिला, आणि आधुनिक जगात गाजत असलेल्या बॅडमिंटन या खेळाचा जन्मही पुण्यात झाला; यामुळे राष्ट्रीय क्रीडाधोरण व क्रीडाकार्यक्रम ठरविण्यासाठी, तो अंमलात आणण्यासाठी आवश्यक ते सारे प्रयत्न करण्यात पुढाकार घेण्याची महाराष्ट्रावर खास जबाबदारी पडते, असेही म्हणणे वावगे ठरू नये.

१९८२ च्या सप्टेंबरात भारताचे पहिले क्रीडामंत्री होताच सरदार बुटासिंग यांनी सर्व राज्यांच्या क्रीडासंबंधित मंत्र्यांची व अधिकाऱ्यांची सभा ऑक्टोबरात बोलाविली. राष्ट्रीय क्रीडाधोरण मुक्रर करण्याचे महत्त्व सांगून त्या कामी सहकार्य करण्याचे आवाहन त्यांनी सभेस केले. नवव्या आशियाई क्रीडास्पर्धा भारतात झाल्याने निर्माण झालेली क्रीडोत्साहाची वाफ द्रवरूपाने गळली नाही तोवरच राष्ट्रीय क्रीडाधोरण ठरविण्याच्या कामास गती आलेली बरी ! तवा तापलेला असताच भाकरी भाजून घेतलेली बरी ! राष्ट्रीय क्रीडाधोरण ठरविण्याच्या, शक्यतो लवकर व तरीही शक्यतो सर्वंकष असे ठरविण्याच्या, कामात महाराष्ट्र सरकार, त्याचे संबंधित मंत्री, अधिकारी संपूर्ण सहकार्य देतील व त्या कामी राज्यातील अनुभवी, माहितगार, तज्ज्ञ मंडळींचे सहकार्यही प्राप्त करून घेतील, अशी काळजी महाराष्ट्रातील सर्व क्रीडाप्रेमीयांनी घ्यावयास हवी.

* * *

# आधुनिक उपकरणे



धावण्याच्या, पोहण्याच्या, दुचाकी चालविण्याच्या शर्यतींत भाग घेणाऱ्यांचे कौशल्य, हालचालींची शास्त्रशुद्धता जसजशी वाढू लागली तसतशी प्रत्येक शर्यत अधिकाधिक चुरशीची होऊ लागली. शर्यत संपण्याच्या अखेरच्या क्षणी, तिच्या अंतिम रेषेवर सर्वच स्पर्धक इतके एकमेकापाठोपाठ पोंचू लागले की त्यांनी अंतिम रेषा कोणी कोणत्या क्रमाने ओलांडली म्हणजेच पहिला कोण, दुसरा कोण....आठवा कोण हे केवळ दृष्टीने, डोळयांनी ठरविणे पंचांना कठीण, अतिकठीण आणि अनेकदा सर्वस्वी अशक्य होऊ लागले. यावर सहज सुचणारा उपाय म्हणजे शर्यतीच्या अंतिम रेषेजवळ सोईस्कर ठिकाणी चलत्चित्र कॅमेरा बसवून त्याने घेतलेल्या चलत्चित्रांतील चित्रांवरून निकाल देणे. एक कॅमेरा एखादे वेळी निष्क्रिय झाला तरी अडचण होऊ नये म्हणून एकाच वेळी दोन वा अधिक कॅमेरे वापरणे हा तो उपाय होय. शर्यत फार अटितटीची झाली म्हणजे तिच्यातील वेगवेगळया स्पर्धकांना नियोजित अंतर धावण्यास, पोहण्यास वगैरे लागणाऱ्या वेळांतील तफावतही



वळणावर आत उतरती असलेली दुचाकीस्पर्धेची धावपट्टी

सूक्ष्म, अतिसूक्ष्म असणार. म्हणून मग प्रत्येक स्पर्धकास लागणारा वेळ मोजणारी घड्याळे फार अचूक व केवळ मिनिटे, सेकंदे दाखविणारी नव्हे एक शतांश सेकंदही अचूक मोजणारी, दर्शविणारी हवी व सर्व स्पर्धकांची घड्याळे अगदी एकदम चालू केली गेली पाहिजेत. अशी अचूक घड्याळे, असे अचूक कालमापन आणि उपरोक्त ते शर्यतीच्या अखेरीची छायाचित्रपट्टी ( फिल्म ) घेणारे कॅमेरे यांची सांगड घालणारी " इलेक्ट्रॉनिक " यंत्रणा आता सिद्ध असून ती आंतरराष्ट्रीय स्पर्धांत वापरली जाऊ लागली आहे. नवव्या आशियाई क्रीडास्पर्धांत तीच वापरली जाणार आहे.

शर्यत चालू करणाऱ्या अधिकाऱ्याच्या म्हणजे " स्टार्टर "च्या मनगटावर एक आवाज टिपणारे यंत्र, " मायक्रोफोन " बांधला जातो. शर्यतीच्या प्रारंभाचा इषारा " स्टार्टर " पिस्तुलाच्या आवाजाने देतो. तो आवाज होताच " स्टार्टर "च्या मनगटावरील तो मायक्रोफोन तो आवाज टिपतो व त्यामुळे तत्काल " ते " कॅमेरे आपोआप चालू होतात. ते घेत असलेल्या चलत्चित्रपट्टीच्या तळाला ( शर्यत सुरू झाल्यापासूनचा ) वेळ तास, मिनिटे, सेकंदे, दशांश सेकंद, शतांश सेकंद दर्शविणाऱ्या आकड्यांत आपोआप उमटत जातो.

परिणामी, त्या चलत्चित्रपट्टीवरून कोणता स्पर्धक अंतिम रेषेपार प्रथम गेला कोण त्यानंतर, कोण त्याहीनंतर हे तर दिसतेच, पण त्यांपैकी प्रत्येकजण अंतिम रेषेपार गेला तेव्हा शर्यत चालू झाल्यापासून किती वेळ झाला होता हेही एक शतांश सेकंदापर्यंत अचूक दिसते.

या चलत्चित्रपट्टीचे " डेव्हलपिंग " वगैरे प्रक्रिया उचित यंत्रांत केवळ ४५ सेकंदांत होत असल्याने शर्यतीचा अत्यंत अचूक निकाल ती संपल्यापासून केवळ ५ सेकंदांत, म्हणजे शर्यत संपल्याचे प्रेक्षकांना समजते ना समजते तोच जाहीर करता येतो. शिवाय, तो दोन वा अधिक कॅमेऱ्यांनी घेतलेल्या चलत्चित्रांवरून आलेला असल्याने त्यात चूक होण्याचा संभव नसतो, कारण एकाच वेळी अनेक कॅमेरे चुकणे जवळजवळ असंभवनीय !



अशा " अचूक कालमापन व शर्यतीच्या अखेरीचे छायाचित्रण " या पद्धतीने, " इलेक्ट्रॉनिक " यंत्रणेत टिपलेले एका शर्यतीच्या अखेरीचे चित्र सोबत दिले आहे.

गोळाफेक, भालाफेक, थाळीफेक, लांब उडी, तिहेरी ( ट्रिपल म्हणजे हॉप, स्टेप अँड जंप ) उडी यांच्या स्पर्धांत अंतर अचूक मोजावे लागते. ते पूर्वी " टेप " ने मोजत. एक तर ते पुरेसे अचूक नसे व त्यास वेळ लागे. हे अंतरमापन अचूक आणि




तत्काल करणारे " इलेक्ट्रॉनिक " यंत्र नवव्या आशियाई क्रीडास्पर्धांत वापरले जाणार आहे. तशा एका यंत्राचे चित्र सोबत आहे.

* * *

# EMBLEM — प्रतीक





नवम एशियाई खेल·दिल्ली

**IX ASIAN GAMES**
**DELHI 1982**

# परिशिष्टे

प्रत्येक ऑलिंपिकप्रमाणेच प्रत्येक आशियाई क्रीडास्पर्धेसाठीही एक प्रीतकचित्र ( लोगो ) ठरविण्याचा शिरस्ता आहे. ज्या शहरात ह्या क्रीडास्पर्धा होणार असतील, त्या शहराचे वैशिष्ट्य दर्शविणारे एक चित्र व त्यात आशियाई स्पर्धेच्या पताकेच्या चिन्हाचा समावेश असे हे प्रतीकचित्र असते. नवव्या आशियाई क्रीडास्पर्धा दिल्ली येथे होणार असल्याने जंतरमंतरच्या रेखाचित्राचा आणि त्यावर आशियाचे म्हणजे पूर्वेचे प्रतीक म्हणून सूर्य असे हे नवव्या आशियाई क्रीडास्पर्धेचे प्रतीक चिन्ह ठरले आहे. दिल्ली शहराचे प्रतीक म्हणून जंतरमंतरची निवड करण्याचे तसेच कारणही आहे. एकतर जंतर-मंतर ही शेकडो वर्षांपूर्वी बांधलेली वेधशाळा नव्या दिल्लीत अगदी मध्यवर्ती ठिकाणी आहे. शिवाय जंतरमंतरचे शिल्प खास भारतीय आहे. त्यावर पश्चिम आशियाई वा पाश्चात्य शिल्पाचा छाप नाही. शिवाय जंतरमंतर हे ज्ञानसाधना व अचूकता या दोन्ही गुणांचे द्योतक आहे; कारण १३ व्या शतकात जंतरमंतर बांधले गेले त्या वेळी भारतीय खगोलशास्त्राची किती, आजही आश्चर्य वाटावे अशी प्रगती झाली होती आणि त्यात आवश्यक ते वेध दिवसा व रात्रीही जंतरमंतर किती अचूकतेने घेत असे हे आजही दिसून येऊ शकते. आशियाई स्पर्धेच्या प्रतीकचित्रात जंतरमंतरचे जे रेखाचित्र आहे, त्यातून स्वाभाविकच क्रीडाप्रेक्षागाराचे चित्रही दिसते तद्वतच ते भारतीय संस्कृतीत शोभा मानल्या गेलेल्या पिंपळपानासारखे काहीसे दिसते आणि भारतीय सभ्यतेचे चिन्ह असलेल्या दोन्ही कर जोडून केलेल्या नमस्काराचा भासही ह्या रेखाचित्रात होतो. या रेखाचित्रावर सोळा किरणस्रोत प्रसारित करणारा सूर्य दाखविण्यात आला आहे. त्यामुळे नवव्या आशियाई क्रीडास्पर्धांच्या या प्रतीकचिन्हास एक लंब त्रिकोणाकृती साज दिसतो.

प्रत्येक ऑलिंपिक स्पर्धेसाठी आणि तद्वतच आशियाई स्पर्धेसाठीही एक बाहुलीचे चित्र ( मस्कॉट ) ठरविले जाते. ही चित्रे वा तदनुसार केलेल्या विविध वस्तूंच्या बाहुल्या या स्पर्धेस येणारे खेळाडू व प्रेक्षक या क्रीडामहोत्सवाची आठवण म्हणून प्राप्त करून घेतात. नवी दिल्ली येथील नवव्या आशियाई क्रीडास्पर्धेसाठी एक दोन पायांवर नाचणारे हत्तीचे छबकडे हे त्यासाठी निवडण्यात आले आहे. त्याच्या शिरोभागी तिलकासमान षोडशकर सूर्य दाखविण्यात आला आहे. हत्ती हा प्राणी शक्ती, शहाणपण आणि निष्ठा यांचे प्रतीक मानला जातो. भारतातील पुराणकथांतून आणि लोककथांतून हत्तीला शुभ चिन्हाचे, राजवैभवाचे सुचिन्ह मानले गेले आहे. नवव्या आशियाई स्पर्धेसाठी ठरविलेले हे बाहुली चित्र ( मस्कॉट ) आनंदाने, उत्साहाने मागील दोन पायांवर नाचणाऱ्या

हत्तीच्या पिलाचे आहे.

ही दोन जशी ऑलिंपिक वा आशियाई क्रीडा स्पर्धांचे स्थानमाहात्म्य दर्शविणारी चिन्हे असतात तद्वतच विजयी वीरांना देण्यात येणारी पदकेही असतात. आतापर्यंत आशियाई स्पर्धेत देण्यात येणाऱ्या पदकाच्या एका बाजूला आशियाई क्रीडेचे प्रतीक म्हणून सूर्य, त्याखाली " सतत पुढेच ( एव्हर ऑनवर्ड ) " हे बोधवाक्य आणि तळाला २१ वर्तुळांची साखळी असे. पण आता आशियाई क्रीडास्पर्धा संघटनेत चौतीस सभासद राष्ट्रे असल्याने दिल्लीच्या आशियाई स्पर्धेत देण्यात येणाऱ्या पदकांवर मात्र ३४ वर्तुळांची साखळी असेल. त्या पदकाच्या दुसऱ्या बाजूस नवव्या आशियाई स्पर्धेचे प्रतीकचिन्ह म्हणजे जतरमंतरचे चित्र असेल आणि त्याखाली त्या त्या क्रीडा प्रकाराचा, खेळाचा नामनिर्देश असेल.

# सहभागी देश

नवी दिल्ली येथे नोव्हेंबर–डिसेंबर १९८२ मध्ये होणाऱ्या नवव्या आशियाई क्रीडास्पर्धांत कोणता देश कोणत्या क्रीडाप्रकारांत भाग घेणार आहे, ते पुढीलप्रमाणे :

**अफगाणिस्तान :** बॅडमिन्टन, मुक्केबाजी ( मुष्टियुद्ध ), टेबल-टेनिस, लॉन–टेनिस व कुस्ती.

**बहारीन :** ॲथलेटिक्स, गोल्फ, हँडबॉल, निशानेबाजी ( बंदुकीने नेमबाजी ), तैराकी ( पोहणे ), टेबल–टेनिस, लॉन–टेनिस, भारोत्तोलन.

**बांग्लादेश :** ॲथलेटिक्स, मुष्टियुद्ध, फुटबॉल, पुरुषांची हॉकी, तैराकी, व्हॉलीबॉल व कुस्ती.

**ब्रह्मदेश :** ॲथलेटिक्स, फुटबॉल, गोल्फ, नौकानयन ( वल्हविणे–रोईंग ) व्हॉलीबॉल व पालनौकानयन ( शिडाच्या नौकांच्या शर्यती )

**चीन :** तिरंदाजी, ॲथलेटिक्स, बॅडमिन्टन, बॉस्केटबॉल, साइकल–दौड ( दुचाकी स्पर्धा ), फुटबॉल, जिमनॅस्टिक्स, हँडबॉल, पुरुषांची हॉकी, नौकानयन, निशानेबाजी, तैराकी ( पोहणे ), टेबल–टेनिस, लॉन–टेनिस, व्हॉली-बॉल, भारोत्तोलन ( वेट लिफ्टिंग ), कुस्ती व पालनौकानयन.

**दक्षिण कोरिया :** सर्व क्रीडाप्रकार म्हणजे तिरंदाजी, ॲथलेटिक्स, बॅडमिन्टन, बास्केटबॉल, मुक्केबाजी, साइकल-दौड, घुडसवारी ( घोड्यावर स्वार होऊनचे क्रीडाप्रकार– इक्वेस्टेरियन इव्हेन्टस् ), फुटबॉल, जिमनॅस्टिक्स, गोल्फ, हँडबॉल, पुरुषांची हॉकी, महिलांची हॉकी, नौकानयन, निशाने-बाजी, तैराकी, टेबल–टेनिस, लॉन ( हिरवळीवरील ) टेनिस, व्हॉली-बॉल, भारोत्तोलन, कुस्ती व पालनौकानयन.

**हाँगकाँग :** तिरंदाजी, ॲथलेटिक्स, बॅडमिन्टन, बॅास्केटबॉल, मुक्केबाजी, साइकल-दौड, जिमनॅस्टिक्स, पुरुषांची हॉकी, महिलांची हॉकी, नौकानयन, निशानेबाजी, तैराकी, टेबल-टेनिस, व व्हॉलीबॉल.

**इंडोनेशिया :** तिरंदाजी, ॲथलेटिक्स, बॅडमिन्टन, मुक्केबाजी, साइकल-दौड, घुडसवारी, जिमनॅस्टिक्स, गोल्फ, नौकानयन, निशानेबाजी, तराकी, टेबल-टेनिस, लॉन टेनिस, व्हॉलीबॉल, भारोत्तोलन, कुस्ती व पालनौकानयन.

**इराण :** ॲथलेटिक्स, बॅडमिन्टन, बॅास्केटबॉल, साइकल-दौड, फुटबॉल, जिमनॅस्टिक्स, हॅंडबॉल, निशानेबाजी, तैराकी, टेबल-टेनिस, व्हॉलिबॉल, भारोत्तोलन व कुस्ती.

**इराक :** ॲथलेटिक्स, बास्केटबॉल मुक्केबाजी, साइकल-दौड, घुडसवारी, फुटबॉल, जिमनॅस्टिक्स, हॅंडबॉल, निशानेबाजी, तैराकी, टेबल-टेनिस, लॉन टेनिस, व्हॉलीबॉल, भारोत्तोलन व कुस्ती.

**जपान :** सर्व क्रीडाप्रकार.

**उत्तर कोरिया :** तिरंदाजी, ॲथलेटिक्स, बास्केटबॉल, मुक्केबाजी, फुटबॉल, जिमनॅस्टिक्स, नौकानयन, निशानेबाजी, तैराकी, टेबल-टेनिस, लॉन टेनिस, व्हॉलिबॉल, भारोत्तोलन, कुस्ती व पालनौकानयन.

**कुवेत :** ॲथलेटिक्स, बास्केटबॉल, मुक्केबाजी, घुडसवारी, फुटबॉल, जिमनॅस्टिक्स, हॅंडबॉल, तराकी, टेबल-टेनिस, लॅान टेनिस व व्हॉलिबॉल.

**लाओस :** ॲथलेटिक्स, मुक्केबाजी, फुटबॉल, निशानेबाजी, टेबलटेनिस व व्हॉलिबॉल.

**मलेशिया :** चार ( हॅंडबॉल, नौकानयन, लॅान टेनिस व कुस्ती ) वगळता बाकी सर्व.

**मंगोलिया :** तिरंदाजी, ॲथलेटिक्स, मुक्केबाजी, साइकल-दौड, जिमनॅस्टिक्स, निशानेबाजी, व्हॉलिबॉल, भारोत्तोलन व कुस्ती.

**पाकिस्तान :** चार ( तिरंदाजी, फुटबॉल, हॅंडबॉल व महिलांची हॉकी ) वगळत बाकी सर्व.

**कतार :** ॲथलेटिक्स, हॅंडबॉल, व व्हॉलिबॉल,

**सौदी अरेबिया :** तिरंदाजी, ॲथलेटिक्स, बास्केटबॉल, मुक्केबाजी, साइकल दौड, फुटबॉल, जिमनॅस्टिक्स, हॅंडबॉल, निशानेबाजी, तैराकी, टेबल-टेनिस, व्हॉलिबॉल, भारोत्तोलन व कुस्ती.

**सिंगापूर :** ॲथलेटिक्स, बॅडमिन्टन, घुडसवारी, निशानेबाजी, तैराकी, भारोत्तोलन, व पालनौकानयन.

**श्रीलंका :** ॲथलेटिक्स, बॅडमिन्टन, बास्केटबॉल, मुक्केबाजी, साइकल–दौड, फुटबॉल, गोल्फ, पुरुषांची हॉकी, महिलांची हॉकी, निशानेबाजी, तैराकी, टेबल–टेनिस, लॉन टेनिस, भारोत्तोलन, कुस्ती व पालनौकानयन.

**सीरिया :** ॲथलेटिक्स, मुक्केबाजी, साइकल–दौड, फुटबॉल, हँडबॉल, निशानेबाजी, भारोत्तोलन व कुस्ती.

**थाएलंड :** तिरंदाजी, ॲथलेटिक्स, बॅडमिन्टन, बास्केटबॉल, मुक्केबाजी, साइकल–दौड, घुडसवारी, फुटबॉल, जिमनॅस्टिक्स, गोल्फ, निशानेबाजी, टेबल-टेनिस, लॉन टेनिस, भारोत्तोलन, व पालनौकानयन.

**संयुक्त अरब अमिरात** ( युनायटेड अरब इमिरेट ) : ॲथले टिक्स, बास्केटबॉल, साइकल-दौड, फुटबॉल, हँडबॉल, निशानेबाजी, तैराकी, टेबल - टेनिस व व्हॉलिबॉल

**विएतनाम :** ॲथलेटिक्स, साइकल–दौड, निशानेबाजी, तैराकी व टेबल-टेनिस.

**येमेन** ( वाय. ए. आर–येमेन अरब रिपब्लिक ) : ॲथलेटिक्स, बास्केटबॉल, फुटबॉल, टेबल टेनिस, व्हॉलिबॉल व कुस्ती.

**येमेन** ( पी. डी. आर–पिपल्स डेमोक्रॅटिक रिपब्लिक ) : ॲथलेटिक्स, बास्केटबॉल, मुक्केबाजी, फुटबॉल, निशानेबाजी, टेबल–टेनिस, लॉन टेनिस, व्हॉलिबॉल व भारोत्तोलन.

**भारत** ( यजमान देश ) : सर्व क्रीडाप्रकार.

* * *

# नवव्या आशियाई क्रीडास्पर्धांचे वेळापत्रक

काळ : १६ दिवस, ता. १९ नोव्हेंबर ते ४ डिसेंबर १९८२

एकूण स्पर्धा : १८४, एकूण पदके : ५५९, संभाव्य सहभागी देश : ३१

| क्रीडा प्रकार | स्थळ | तारीख व वेळ | स्पर्धा संख्या | पदकांची संख्या सुवर्ण | रौप्य | कांस्य | संभाव्य सहभागी देश |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | | | ६ |
| तिरंदाजी | दिल्ली विद्यापीठ क्रीडांगण | २१ व २२ नोव्हेंबर ( स. ९-३० ते १२-३० दुपारी २ ते ४ ) | ६ स्पर्धा ( स्त्री व पुरुषांसाठी ) | ८ | ८ | ८ | चीन, हाँगकाँग, भारत, जपान, दक्षिण कोरिया, मंगोलिया, सौदी अरेबिया, सीरिया, मलेशिया व इंडोनेशिया. |
| ॲथलेटिक्स | नेहरू प्रेक्षागार | २५ नोव्हेंबर ते २ डिसेंबर ( २९ नोव्हेंबर विश्रांतीचा दिवस ) ( स. १० ते ११-४५ व दु. १-३० ते ४-३० ) | पुरुषांसाठी २४ स्त्रियांसाठी १६ | ५२ | ५२ | ५२ | चीन, हाँगकाँग, भारत, इराण, जपान, दक्षिण कोरिया, बहरीन, कुवेत, पाकिस्तान, बांगलादेश, ब्रह्मदेश, इंडोनेशिया, उत्तर कोरिया, मलेशिया, कतार, श्रीलंका, सीरिया, येमेन, सौदी अरेबिया, इराक, लाओस, विएतनाम, सिंगापूर व युनायटेड अरब एमिरेट्स. |
| बॅडमिंटन | इंद्रप्रस्थ प्रेक्षागार | २५ नोव्हेंबर ते ३ डिसेंबर ( सकाळी ९ ते १ व दुपारी २ ते रात्री ८ ) | ७ स्पर्धा ( पुरुष व स्त्रियांसाठी ) | २० | २० | ४० | चीन, हाँगकाँग, भारत, इराण, जपान, दक्षिण कोरिया, पाकिस्तान, अफगाणिस्तान, सिंगापूर, मलेशिया, इंडोनेशिया व श्रीलंका. |

| १ | २ | ३ | ४ | | ५ | | ६ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| बास्केटबॉल | नवी दिल्ली म्युनिसिपल समितीचे बंदिस्त-प्रेक्षागार, तालकटोरा | नोव्हेंबर २० ते डिसेंबर ३ (सकाळी ९ ते १२ व दुपारी १ ते रात्री १०) | २ स्पर्धा (पुरुष व स्त्रियांसाठी) | २४ | २४ | २४ | चीन, हाँगकाँग, भारत, इराण, जपान, मलेशिया, श्रीलंका, येमेन, दक्षिण कोरिया, कुवेत, पाकिस्तान, सौदी अरेबिया, इराक व युनायटेड अरब एमिरेट्स. |
| मुष्टियुद्ध | क्रीडा महल मथुरा रोड | २६ नोव्हेंबर ते ३ डिसेंबर (२ डिसेंबर विश्रांती दिन) (दुपारी ५ ते रात्रौ १०) | १२ वजनगट | १२ | १२ | २४ | भारत, जपान, दक्षिण कोरिया, कुवेत, मंगोलिया, पाकिस्तान, सौदी अरेबिया, सीरिया, अफगणिस्तान, इराक, बांग्लादेश, हाँगकाँग, इंडोनेशिया, मलेशिया, श्रीलंका, येमेन, लाओस |
| दुचाकी स्पर्धा | यमुना दुचाकी स्पर्धापट्टी | २१ नोव्हेंबर ते २८ नोव्हेंबर (सकाळी ९ ते १२ व दुपारी १ ते ४-३०) | ७ स्पर्धा पुरुषांसाठी | १३ | १३ | १३ | चीन, हाँगकाँग, भारत, इराण, जपान, दक्षिण कोरिया, मंगोलिया, पाकिस्तान, सौदी अरेबिया, सीरिया, युनायटेड अरब एमिरेट्स, इंडोनेशिया, मलेशिया, श्रीलंका, विएतनाम व इराक. |
| अश्वारूढ | हरबक्ष प्रेक्षागार व निकलसन | २० नोव्हेंबर ते २७ नोव्हेंबर (दि. २४ व २६ नोव्हेंबर | ३ स्पर्धा पुरुषांसाठी | ७ | ७ | ७ | भारत, जपान, दक्षिण कोरिया, कुवेत, पाकिस्तान, इराक, सिंगापूर, इंडोनेशिया व मलेशिया. |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | धावपट्टी | विश्रांती दिन ) सकाळी ९ ते १२ व दुपारी २ ते ४-३० | | | | | |
| फुटबॉल | आंबेडकर प्रेक्षागार, मॉडेल टाऊन प्रेक्षागार व नेहरू प्रेक्षागार | २० नोव्हेंबर ते ३ डिसेंबर दुपारी १-३० ते ४-३० आंबेडकर प्रेक्षागार व मॉडेल टाऊन प्रेक्षागार दु. ५-३० ते रात्रौ १० नेहरू प्रेक्षागार | | १८ | १८ | १८ | चीन, भारत, इराण, जपान, दक्षिण कोरिया, कुवेत, पाकिस्तान, सौदी अरेबिया, सीरिया, इराक, लाओस, येमेन, बांगलादेश, ब्रह्मदेश, मलेशिया, श्रीलंका व युनायटेड अरब एमिरेट्स |
| गोल्फ | दिल्ली गोल्फ क्लब | २१ नोव्हें. ते २४ नोव्हें. सकाळी ७ ते दु. ५. | पुरुषांसाठी २ स्पर्धा. स्त्रियांसाठी ४ स्पर्धा. | ५ | ५ | ५ | भारत, जपान, दक्षिण कोरिया, पाकिस्तान, बहरीन, ब्रह्मदेश, इंडोनेशिया, श्रीलंका, कुवेत व मलेशिया. |
| कसरतीचे विविध व्यायाम प्रकार. | इंद्रप्रस्थ प्रेक्षागार | २० नोव्हें. ते २३ नोव्हें. स. १० ते दु. १ व दु. ५ ते रात्री ८. | पुरुषांसाठी ६ स्पर्धा. स्त्रियांसाठी ३ स्पर्धा. | २४ | २४ | २४ | चीन, भारत, जपान, दक्षिण कोरिया, कुवेत, मंगोलिया, पाकिस्तान, सौदी अरेबिया, इराक, हाँगकाँग, इंडोनेशिया, इराण व मलेशिया. |
| हॅन्डबॉल | दिल्ली विद्यापीठ क्रीडांगण. | २३ नोव्हें ते ३० नोव्हें. स. १० ते दु. १२.३० व दु. २ ते ४.४०. | फक्त पुरुषां-साठी स्पर्धा. | १६ | १६ | १६ | चीन, भारत, इराण, जपान, दक्षिण कोरिया, कुवेत, सौदी अरेबिया, सीरिया, युनायटेड अरब एमिरेट्स, इराक, बहरीन व कतार. |

| १ | २ | ३ | ४ | ५ | | | ६ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| हॉकी (पुरुषांसाठी) | राष्ट्रीय प्रेक्षागार | २० नोव्हें. ते १ डिसें. स. ९ ते १२ व दु.१·३० ते ४·३०. | एक | १६ | १६ | १६ | चीन, भारत, जपान, दक्षिण कोरिया, पाकिस्तान, हाँगकाँग व श्रीलंका. |
| हॉकी (स्त्रियांसाठी) | शिवाजी प्रेक्षागार | २० नोव्हें. ते २६ नोव्हें. स. ९·३० ते ११·३० व दु. १·३० ते ४·३०. | एक | १६ | १६ | १६ | भारत, जपान, दक्षिण कोरिया, हाँगकाँग, मलेशिया, पाकिस्तान व श्रीलंका. |
| वल्हविणे | रामगड सरोवर, जयपूर. | २० नोव्हें. ते २५ नोव्हें. स. ९·३० ते १२ व दु. ३ ते ५. | पुरुषांसाठी ४ स्पर्धा. | ११ | ११ | ११ | चीन, भारत, जपान, दक्षिण कोरिया, पाकिस्तान, उत्तर कोरिया, हाँगकाँग, ब्रह्मदेश व इंडोनेशिया. |
| बंदुकीची नेमबाजी | तुघलकाबाद मैदान | २२ नोव्हें. ते २ डिसें. ( २९ नोव्हें. विश्रांती दिन ) स. ९ ते १२·३० व दु. २ ते ४·३०. | पुरुषांसाठी ११ स्पर्धा. | ५५ | ५५ | ५५ | चीन, हाँगकाँग, भारत, इराण, जपान, दक्षिण कोरिया, मंगोलिया, पाकिस्तान, सौदी अरेबिया, सीरिया, बहरीन, कोरिया, इंडोनेशिया, इराक, कुवेत, लाओस, मलेशिया, सिंगापूर, श्रीलंका, युनायटेड अरब एमिरेट्स, व्हिएतनाम व येमेन. |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| पोहणे | तालकटोरा तलाव | २० नोव्हें. ते २९ नोव्हें. स. ९·३० ते १२·३० व दु. १·३० ते ४·३०. | पुरुषांसाठी १८ स्पर्धा. स्त्रियांसाठी १६ स्पर्धा. | ६१ | ६१ | ६१ | चीन, हाँगकाँग, भारत, इराण, जपान, दक्षिण कोरिया, कुवेत, पाकिस्तान, सौदी अरेबिया, युनायटेड अरब एमिरेट्स, इराक, व्हिएतनाम, सिंगापूर, बहरीन, बांग्लादेश, उत्तर कोरिया, इंडोनेशिया, मलेशिया व श्रीलंका. |
| टेबल-टेनिस | क्रीडा महाल, मथुरा रोड. | १९ नोव्हें. ते २५ नोव्हें. ( १९ नोव्हें. – अर्धा दिवस ) स. ९ ते १२ व दु. ३ ते रात्री १०. | ७ स्पर्धा– ( पुरुष व स्त्रियांसाठी ) | १७ | १७ | २५ | चीन, हाँगकाँग, भारत, इराण, जपान, दक्षिण कोरिया, कुवेत, पाकिस्तान, सौदी अरेबिया, अफगाणिस्तान, इराक, लाओस, व्हिएतनाम, बहरीन, उत्तर कोरिया, इंडोनेशिया, मलेशिया, श्रीलंका, येमेन व युनायटेड अरब एमिरेट्स. |
| टेनिस | दिल्ली लॉन टेनिस असोसिएशन कोर्टस, रामकृष्णनगर | २० नोव्हें. ते १ डिसें. स. ११ ते दु. ४–३० | ७ स्पर्धा ( पुरुष व स्त्रियांसाठी ) | १६ | १६ | १६ | चीन, हाँगकाँग, भारत, जपान, दक्षिण कोरिया, कुवेत, पाकिस्तान, सौदी अरेबिया, अफगाणिस्तान, इराक, विएतनाम, बहरीन, उत्तर कोरिया, इंडोनेशिया, लाओस, श्रीलंका व येमेन. |
| व्हॉलीबॉल | इंद्रप्रस्थ बंदिस्त प्रेक्षागार | २० नोव्हें. ते ३ डिसें. स. ९ ते १ व दु. ३ ते रात्रौ १० | २ स्पर्धा ( पुरुष व स्त्रियांसाठी ) | २४ | २४ | २४ | चीन, हाँगकाँग, भारत, इराण, जपान, दक्षिण कोरिया, कुवेत, पाकिस्तान, सौदी अरेबिया, इराक, लाओस, बांग्लादेश, ब्रह्मदेश, मलेशिया, उत्तर कोरिया, इंडोनेशिया, कतार, येमेन व युनायटेड अरब एमिरेट्स. |

| १ | २ | ३ | ४ | ५ | | | ६ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| भारोत्तोलन (वेटलिफ्टिंग) | एशियाड ग्राम | २० नोव्हें. ते २९ नोव्हें. दु. २–३० ते सायं. ६–३० | १० वजन गट ( पुरुषांसाठी फक्त ) | ३० | ३० | ३० | चीन, भारत, इराण, जपान, दक्षिण कोरिया, मंगोलिया, पाकिस्तान, सौदी अरेबिया, सीरिया, इराक, सिंगापूर, बहरीन, उत्तर कोरिया, हाँगकाँग, मलेशिया, श्रीलंका व येमेन. |
| कुस्ती | आंबेडकर प्रेक्षागार | २८ नोव्हें. ते २ डिसें. दु. १–३० ते ४–३० | १० वजन गट ( पुरुषांसाठी फक्त ) | १० | १० | १० | चीन, भारत, इराण, जपान, दक्षिण कोरिया, मंगोलिया, पाकिस्तान, सौदी अरेबिया, सीरिया, इराक, अफगाणिस्तान, बांगलादेश, उत्तर कोरिया, इंडोनेशिया, श्रीलंका व यमेन. |
| शिडांच्या बोटी | मुंबई येथील अरबी समुद्र | २० नोव्हें. ते २८ नोव्हें. दु. ३ ते ५–३० | ४ स्पर्धा ( पुरुषांसाठी फक्त ) | ८ | ८ | ८ | चीन, भारत, जपान, दक्षिण कोरिया, पाकिस्तान, थायलंड, श्रीलंका, सिंगापूर, इंडोनेशिया, उत्तर कोरिया, ब्रह्मदेश, मलेशिया व फिलिपाईन्स. |

# आशियाई क्रीडास्पर्धांतील ॲथलेटिक्सचे उच्चांक

| स्पर्धा<br>१ | वर्ष<br>२ | उच्चांकधारकाचे नाव<br>३ | देश<br>४ | वेळ / अंतर<br>५ |
|---|---|---|---|---|
| **पुरुषांचे :-** | | | | ता : : मि. : सेकंदे |
| १०० मीटर्स धाव | १९६२ | एम. सारेन्गत | इंडोनेशिया | ० : : ० : १०.४० |
| २०० मीटर्स ,, | १९७४ | ए. रत्नपाल | थायलंड | ० : : ० : २१.०९ |
| ४०० मीटर्स ,, | १९७४ | डब्ल्यू. विमलदास | श्रीलंका | ० : : ० : ४६,२१ |
| ८०० मीटर्स ,, | १९७४ | श्रीराम सिंग | भारत | ० : : १ : ४७.५७ |
| १५०० मीटर्स ,, | १९६६ | के. सावाकी | जपान | ० : : ३ : ४७.३० |
| ५००० मीटर्स ,, | १९७४ | शिवनाथ सिंग | भारत | ० : :१४: २०.५० |
| १०, ००० मीटर्स ,, | १९७० | एस. एल. बी रोसा | सिलोन ( श्रीलंका ) | ० : :२९: ५५.६० |
| मॅरेथॉन | १९७८ | एम. साकामोटो | जपान | २ : :१५: २९.७० |
| ११० मी. हर्डल्स | १९७४ | लिन--नित-त्सुई | चीन | ० : : ० : १४.२६ |
| ४०० मी. हर्डल्स | १९७८ | के. हसन | इराक | ० : : ० : ५०.३१ |
| ३००० मी. (अडथळ्याची शर्यत) स्टीपल चेस | १९७८ | शिन्तावयो मासानारी | जपान | ० : : ८ : ४०.७ |
| उंच उडी | १९७४ | टी. घियास्सी | इराण | २.२१ मीटर्स |
| लांब उडी | १९७४ | टी. सी. योहान्नन | भारत | ८.०७ मीटर्स |

| १ | २ | ३ | ४ | ५ |
|---|---|---|---|---|
| तिहेरी उडी ( हॉप, स्टेप ॲन्ड जंप ) | १९७८ | एम. मासामी | जपान | १६.५६ मीटर्स |
| पोल व्हॉल्ट ( काठीने उडी ) | १९७८ | टी. तोमोमी | जपान | ५.१० मीटर्स |
| भालाफेक ( जॅव्हलीन ) | १९७८ | माऊ–माऊ शेन | चीन | ७९.२४ मीटर्स |
| थाळीफेक ( डिस्कस ) | १९७४ | डी. जे. कश्मिरी | इराण | ५६.८२ मीटर्स |
| गोळाफेक ( शॉट पट ) | १९७४ | डी. जे. कश्मिरी | इराण | १८ ०४ मीटर्स |
| हातोडाफेक ( हॅमर ) | १९७८ | एम. शिगिनोबू | जपान | ६८.२६ मीटर्स |
| ४ X १०० मी. रिले | १९७४ | | थायलंड | ४०.१४ सेकंदे |
| ४ X ४०० मी. रिले | १९७४ | | श्रीलंका | ३ मि. ०७.४० से. |
| दशप्रकार ( डेकॅथॉन ) | १९७४ | व्ही. चौहान | भारत | ७,३७५ गुण |
| २० किलोमीटर्स चालणे | १९७८ | हकिमसिंग | भारत | १ तास ३१ मि. ५४.४० से. |
| **महिलांचे :–** | | | | ता. मि. सेकंदे |
| १०० मीटर्स धाव | १९७० | ची चांग | थायलंड | ० : : ० : ११.६ |
| २०० मीटर्स ,, | १९७४ | ची चांग | थायलंड | ० : : ० : २३.७ |
| ४०० मीटर्स ,, | १९७८ | ओईक् साम सेक | मलेशिया | ० : : ० : ५५.०१ |
| ८०० मीटर्स ,, | १९७० | एच. शेजिफी | इस्राईल | ० : : २ : ०६.५० |
| १५०० मीटर्स ,, | १९७८ | किम ओक् सुन | उत्तर कोरिया | ० : : ४ : १८.९० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३००० मीटर्स धाव | १९७८ | किम ओक सुन | उत्तर कोरिया | ० : : ९ : २४.७० |
| ८० मीटर्स हर्डल्स | १९६६ | आर. सुकेगावा | जपान | ० : : ० : ११.२० |
| ११० मीटर्स हर्डल्स | १९७४ | इ. रोट | इस्राईल | ० : : ० : १३.३१ |
| ४०० मीटर्स हर्डल्स | १९७८ | ज्झान क्शिन | चीन | ० : : १ : ०१.३२ |
| उंच उडी | १९७८ | झेंग दाझ्-हेंग | चीन | १.८८ मीटर्स |
| लांब उडी | १९७४ | क्शिओ जेलिंपग | चीन | ६.३१ मीटर्स |
| भालाफेक | १९७८ | याव रूईजिंग | चीन | ५७.२२ मीटर्स |
| थाळीफेक | १९७८ | लि क्शियाहुई | चीन | ५५.९२ मीटर्स |
| गोळाफेक | १९७८ | शेन लिगुआन | चीन | १७.७० मीटर्स |
| ४ x १०० मी. रिले | १९७८ | | थायलंड | ० : : ० : ४६.२० सेकंदे |
| ४ x ४०० मी. रिले | १९७४ | | जपान | ० : : ३ : ४३.५० सेकंदे |
| पंचप्रकार ( पेन्टॅथॉन ) | १९७० | ई. शेवमोरोव | इस्राईल | ४,५३० गुण |

# आशियाई क्रीडास्पर्धांतील पदक-जेते

पहिल्या आठ आशियाई क्रीडास्पर्धांत कोणत्या देशास किती सुवर्णपदके, किती रौप्यपदके आणि किती कांस्य ( ब्रॉन्झ ) पदके मिळाली हे दर्शविणारे तक्ते :-

**पहिल्या आशियाई क्रीडास्पर्धा ( नवी दिल्ली, १९५१ )**

| देश | सुवर्णपदके | रौप्यपदके | कांस्यपदके |
|---|---|---|---|
| जपान | २४ | ३० | १६ |
| भारत | १७ | १६ | २१ |
| इराण | ८ | ७ | १ |
| सिंगापूर | ४ | ७ | २ |
| फिलिपिन्स | ४ | ६ | ७ |
| सिलोन | ० | १ | ० |
| इंडोनेशिया | ० | ० | ५ |
| ब्रह्मदेश | ० | ० | ३ |

**दुसऱ्या आशियाई क्रीडास्पर्धांतील सुवर्णपदकांची वाटणी पुढील-प्रमाणे झाली होती :-**

जपान – ३८, फिलिपिन्स – १४, दक्षिण कोरिया – ८,
भारत – ५, पाकिस्तान – ५, तैवान – २,
इस्राईल – २, ब्रह्मदेश – २, सिंगापूर – १

## तिसऱ्या आशियाई क्रीडास्पर्धा ( मॅनिला, १९५४ )

| देश | सुवर्णपदके | रौप्यपदके | कांस्यपदके |
|---|---|---|---|
| जपान | ६७ | ४१ | ३० |
| फिलिपिन्स | ८ | १९ | २२ |
| दक्षिण कोरिया | ८ | ७ | १२ |
| इराण | ७ | १४ | ११ |
| तैवान | ६ | ११ | १७ |
| पाकिस्तान | ६ | ११ | ९ |
| भारत | ५ | ४ | ४ |
| दक्षिण विएतनाम | २ | ० | ४ |
| ब्रह्मदेश | १ | २ | १ |
| सिंगापूर | १ | १ | १ |
| थायलंड | ० | १ | ३ |
| हाँगकाँग | ० | १ | १ |
| इंडोनेशिया | ० | ० | ६ |
| मलाया | ० | ० | ३ |
| इस्राईल | ० | ० | २ |
| सिलोन | ० | ० | १ |

## चौथ्या आशियाई क्रीडास्पर्धा ( जकार्ता, १९६२ )

| देश | सुवर्णपदके | रौप्यपदके | कांस्यपदके |
|---|---|---|---|
| जपान | ७१ | ५६ | १९ |
| इंडोनेशिया | ११ | १२ | १९ |
| भारत | १० | १२ | १० |
| फिलिपिन्स | ७ | ५ | १७ |
| पाकिस्तान | ६ | ११ | ९ |
| दक्षिण कोरिया | ४ | ७ | १० |
| थायलंड | २ | ५ | ४ |
| मलेशिया | २ | ४ | ९ |
| ब्रह्मदेश | २ | १ | ४ |
| सिंगापूर | १ | ० | २ |
| इराण | १ | ० | ० |
| हाँगकाँग | ० | २ | ० |
| सिलोन | ० | १ | २ |

## पाचव्या आशियाई क्रीडास्पर्धा ( बँकॉक, १९६६ )

| देश | सुवर्णपदके | रौप्यपदके | कांस्यपदके |
|---|---|---|---|
| जपान | ७७ | ५२ | २७ |
| थायलंड | १३ | १५ | १० |
| दक्षिण कोरिया | ११ | १६ | २० |
| मलेशिया | ७ | ४ | ६ |
| भारत | ७ | ३ | ११ |
| इराण | ६ | ८ | १५ |
| इंडोनेशिया | ५ | ५ | ९ |
| तैवान | ५ | २ | ५ |
| इस्राईल | ३ | ६ | ३ |
| फिलिपिन्स | २ | १४ | २३ |
| पाकिस्तान | २ | ५ | २ |
| ब्रह्मदेश | १ | ० | ५ |
| सिंगापूर | ० | ५ | ९ |
| विएतनाम | ० | १ | १ |
| हाँगकाँग | ० | १ | १ |
| सिलोन | ० | ० | ६ |

## सहाव्या आशियाई क्रीडास्पर्धा ( बँकॉक, १९७० )

| देश | सुवर्णपदके | रौप्यपदके | कांस्यपदके |
|---|---|---|---|
| जपान | ७५ | ४७ | २१ |
| दक्षिण कोरिया | १९ | १३ | ११ |
| इराण | ९ | ७ | ४ |
| थायलंड | ८ | २० | १० |
| भारत | ६ | ९ | १० |
| इस्राईल | ६ | ५ | ५ |
| मलेशिया | ४ | ० | ४ |
| इंडोनेशिया | ३ | ६ | ९ |
| ब्रह्मदेश | ३ | २ | ७ |
| श्रीलंका | २ | २ | ० |
| फिलिपिन्स | १ | ११ | ९ |
| तैवान | १ | ४ | ११ |
| पाकिस्तान | १ | २ | ६ |
| सिंगापूर | ० | ३ | ९ |
| कंबोडिया | ० | २ | ३ |
| दक्षिण विएतनाम | ० | ० | ३ |

## सातव्या आशियाई क्रीडास्पर्धा ( तेहरान, १९७४ )

| देश | सुवर्णपदके | रौप्यपदके | कांस्यपदके |
|---|---|---|---|
| जपान | ६५ | ४९ | ४६ |
| चीन | ३१ | ४३ | २६ |
| इराण | २९ | २० | १६ |
| उत्तर कोरिया | १७ | १२ | १४ |
| दक्षिण कोरिया | १२ | २० | १५ |
| इस्राईल | ७ | ३ | १ |
| थायलंड | ५ | २ | ८ |
| भारत | ४ | १२ | १२ |
| इंडोनेशिया | ३ | ४ | ४ |
| मंगोलिया | २ | ५ | ८ |
| पाकिस्तान | २ | ० | ८ |
| श्रीलंका | २ | ० | ० |
| सिंगापूर | १ | ३ | ७ |
| इराक | १ | ० | २ |
| फिलिपिन्स | ० | २ | १२ |
| मलेशिया | ० | १ | ४ |
| ब्रह्मदेश | ० | १ | २ |
| कुवेत | ० | १ | ० |
| अफगाणिस्तान | ० | ० | १ |

## आठव्या आशियाई क्रीडास्पर्धा ( बँकॉक, १९७८ )

| देश | सुवर्णपदके | रौप्य पदके | कांस्य पदके |
|---|---|---|---|
| जपान | ७० | ५९ | ४९ |
| चीन | ५१ | ५४ | ४६ |
| दक्षिण कोरिया | १८ | २० | ३१ |
| उत्तर कोरिया | १५ | १३ | १५ |
| थायलंड | ११ | १२ | १९ |
| भारत | ११ | ११ | ६ |
| इंडोनेशिया | ८ | ७ | १८ |
| पाकिस्तान | ४ | ४ | ९ |
| फिलिपिन्स | ४ | ४ | ६ |
| इराक | २ | १ | ६ |
| सिंगापूर | २ | १ | ४ |
| मलेशिया | २ | १ | ३ |
| मंगोलिया | १ | ३ | ५ |
| लिबिया | १ | १ | ० |
| सीरिया | १ | ० | ० |
| ब्रूनी | ० | ३ | ३ |
| हाँगकाँग | ० | २ | ३ |
| श्रीलंका | ० | ० | १ |
| कुवेत | ० | ० | १ |

# आशियाई क्रीडास्पर्धांतील उच्चांक

कोणत्याही क्रीडास्पर्धेची गुणवत्ता वाढती आहे की नाही आणि वाढत असल्यास कसकशी सुधारत आहे, हें दर्शविणारे काही निकष संभवतात. त्यांपैकी, त्या स्पर्धांत विविध बाबींत उच्चांक किती व ते किती ताजे हा एक निकष संभवतो. त्या दृष्टीने पुढे दिलेले आशियाई क्रीडास्पर्धांतील उच्चांक मनोरंजक ठरावे.

आपल्या आधी सर्वोत्कृष्ट पराक्रम कोणता होता हे जाणून त्याहून मोठा पराक्रम करून दाखविण्याची ईर्षा तरूण खेळाडूंत असणेच केव्हाही प्रगतिकारक. त्याही दृष्टीने पुढे दिलेले आजवेरीच्या आशियाई क्रीडास्पर्धांतील उच्चांक, विक्रम उपयुक्त ठरू शकतील.

यांपैकी किती उच्चांक नवव्या आशियाई क्रीडास्पर्धांनंतर "शिळे" ठरतात ते पहावे !

## आशियाई क्रीडास्पर्धांतील कसरत-व्यायाम ( जिम्नॅस्टिक्स ) स्पर्धेचे उच्चांक

| स्पर्धा | वर्ष | उच्चांक धारकाचे नाव | देश | गुण |
|---|---|---|---|---|
| **पुरुषांसाठी :–** | | | | |
| हॉर्स व्हॉल्ट | १९७८ | जे. किटगावा | जपान | १९·४० |
| पॅरलल् बारस् | १९७८ | जे. किटगावा | जपान | १९·५० |
| रिंग्ज | १९७८ | हंग यू पिन | चीन | १९·१५ |
| साईड हॉर्स | १९७८ | त्साय हून्ग त्संग | चीन | १९·२० |
| फ्लोअर एक्झरसाईजेस | १९७८ | ली यू चिन | चीन | १९·४५ |
| हॉरिझॉन्टल बार | १९७८ | जे. किटगावा | जपान | १९·७५ |
| टीम चॅम्पियनशिप | १९७८ | – | चीन | २८६·७० |
| वैयक्तिक चँम्पियनशिप | १९७४ | के. होराईड | जपान | ११३·२० |
| **स्त्रियांसाठी :—** | | | | |
| फ्लोअर एक्झरसाईजेस | १९७४ | एस. वाय. चिआंग | चीन | १९·३५ |
| बॅलन्स बीम | १९७८ | चू चेंग ची | चीन | १९·४० |
| अन्-ईव्हन पॅरलल् बार्स | १९७८ | मा येन हँग | चीन | १९·६५ |
| टीम चॅम्पियनशिप | १९७८ | – | चीन | १९१·५५ |
| वैयक्तिक चॅम्पियनशिप | १९७४ | एस. वाय. चिआंग | चीन | ७५·९५ |

# आशियाई क्रीडास्पर्धांतील भारोत्तोलन स्पर्धेचे उच्चांक

| स्पर्धा | वर्ष | स्पर्धकाचे नाव | देश | वजन ( कि. ग्रॅ. ) |
|---|---|---|---|---|
| फ्लायवेट ( ५२ कि. ग्रॅ. पर्यंत ) | १९६६ | सी. सुकचिन्दा | थायलंड | ३२२.५ |
| बॅन्टमवेट ( ५६ कि. ग्रॅ. पर्यंत ) | १९७० | मोहम्मद नासिरी | इराण | ३६५.० |
| फेदरवेट ( ६० कि. ग्रॅ. पर्यंत ) | १९७० | वाय. मियाके | जपान | ३८५.० |
| लाईटवेट ( ६७.५ कि. ग्रॅ. पर्यंत ) | १९७० | नसरल्ली देहनवी | इराण | ४२५.० |
| मिडलवेट ( ७५ कि. ग्रॅ. पर्यंत ) | १९६६ | एस. ओशी | जपान | ४५५.० |
| लाईट हेवी वेट ( ८२.५ कि. ग्रॅ. पर्यंत ) | १९७० | एस. ओशी | जपान | ४६०.० |
| मिडल-हेवी वेट ( ९० कि. ग्रॅ. पर्यंत ) | १९६६ | ह्युंग वुली | दक्षिण कोरिया | ४२५-५ |
| हेवी वेट ( ११० कि. ग्रॅ. पर्यंत ) | १९६६ | एस. बरौमॅनो | इराण | ४९० |
| सुपर हेवी वेट ( ११० कि. ग्रॅ. चे वर ) | १९७४ | ए. शोराआळाही | इराण | ३१७.५ |
| ११० कि. ग्रॅ. चे वर | १९७८ | एच. सी. यांग | चीन | ३२० |

## आशियाई क्रीडास्पर्धांतील बंदुकीच्या नेमबाजीमधील स्पर्धेचे उच्चांक

| स्पर्धा | वर्ष | स्पर्धकाचे नाव | देश | गुण |
|---|---|---|---|---|
| पिस्तुल – स्टँडर्ड | १९७८ | त्से निंगा तंग | चीन | ५७१ |
| पिस्तुल – स्टँडर्ड ( सांघिक ) | १९७८ | – | चीन | २,२५७ |
| हवेच्या दाबाचे पिस्तुल ( एअर पिस्तोल ) | १९७८ | एस. फुमिहिसा | जपान | ३८३ |
| हवेच्या दाबाचे पिस्तुल ( सांघिक ) | १९७८ | – | जपान | १,५०७ |
| एअर रायफल | १९७४ | रि हो जून | उत्तर कोरिया | ३८३ |
| | १९७८ | ली चीन पेन्ग | चीन | ३८३ |
| एअर रायफल ( सांघिक ) | १९७८ | – | चीन | १,५१४ |
| सेन्टर फायर पिस्तुल | १९७४ | एच. आकात्सुका | जपान | ५८२ |
| | १९७८ | ए. हिरो युकी | जपान | ५८२ |
| सेन्टर फायर पिस्तुल ( सांघिक ) | १९७४ | – | चीन | २,३१४ |
| पिस्तुल–रॅपिड फायर | १९७८ | जॉन्ग किल पार्क | उत्तर कोरिया | ५९३ |
| पिस्तुल रॅपिड फायर ( सांघिक ) | १९७८ | – | उत्तर कोरिया | २,३९८ |
| पिस्तुल–फ्री | १९७८ | सुचिन–पो | चीन | ५६० |
| पिस्तुल–फ्री ( सांघिक ) | १९७८ | – | चीन | २,१८२ |

| स्पर्धा | वर्ष | स्पर्धकाचे नाव | देश | गुण |
|---|---|---|---|---|
| स्मॉल बोअर रायफल तीन | १९७८ | | | |
| वेगवेगळे मोहरे ( सांघिक ) | १९७८ | – | चीन | ४,५५६ |
| स्कीट | १९७४ | टी असो | जपान | १९४ |
| स्कीट ( सांघिक ) | १९७८ | – | जपान | ५५८ |
| ट्रॅप | १९७४ | मात्सुओका | जपान | १९२ |
| ट्रॅप ( सांघिक ) | १९७४ | – | जपान | ५४३ |
| स्मॉल-बोअर रायफल-प्रोन | १९७८ | के. क्युंग हौ | उत्तर कोरिया | ५९८ |
| स्मॉल-बोअर रायफल-प्रोन (सांघिक) | १९७८ | – | उत्तर कोरिया | २,३६१ |
| स्मॉल बोअर रायफल-थ्री-पोझिशन्स | १९७८ | रि हो जून | उत्तर कोरिया | १,१४८ |
| स्टँडर्ड रायफल | १९७८ | किम डोन्ग गिल | उत्तर कोरिया | ५७७ |
| स्टँडर्ड रायफल ( सांघिक ) | १९७८ | – | चीन | २,२८० |
| फ्री-रायफल | १९५८ | ए. फेलिशिआनो | फिलिपाईन्स | १,०६९ |

## आशियाई क्रीडास्पर्धांतील जलतरण स्पर्धेचे उच्चांक

| स्पर्धा | वर्ष | स्पर्धकाचे नाव | देश | वेळ/गुण मि. से. |
|---|---|---|---|---|
| **पुरुषांसाठी :–** | | | | |
| १०० मी. फ्रीस्टाईल | १९७८ | टी. यानागिदानो | जपान | ५४.०१ से. |
| २०० मी. फ्रीस्टाईल | १९७८ | आर. जेरार्डो | फिलिपिन्स | १:५६.५८ |
| ४०० मी. फ्रीस्टाईल | १९७८ | टी. शुनि | जपान | ४:०६.८३ |
| १५०० मी. फ्रीस्टाईल | १९७८ | टी. शुनि | जपान | १६:१४.९२ |
| १०० मी. ब्रेकस्ट्रोक | १९७८ | केंजि इकेडा | जपान | १:०.७६ |
| २०० मी. ब्रेकस्ट्रोक | १९७८ | टी. ताकाहाशि | जपान | २:१०.८७ |
| १०० मी. ब्रेकस्ट्रोक | १९७८ | टी. शिंगेहिरो | जपान | १:०४.९४ |
| २०० मी. ब्रेकस्ट्रोक | १९७८ | टी. शिंगेहिरो | जपान | २:२२.५६ |
| १०० मी. बटरफ्लाय | १९७४ | एच. हारा | जपान | ५८.२१ से. |
| २०० मी. बटरफ्लाय | १९७४ | वाय. कोमाझाकी | जपान | २:०८.१४ |
| ४०० मी. मिड्ले | १९७८ | टी. यानागिदातो | जपान | २:१०.२२ |
| ४०० मी. मिड्ले | १९७८ | टी. कोज्झो | जपान | ४:४०.८० |
| ४X १०० मी. फ्रीस्टाईल रिले | १९७८ | — | जपान | ३:३५.९१ |
| ४X २०० मी. फ्रीस्टाईल रिले | १९७८ | — | जपान | ७:४९.७५ |
| ४X १०० मी. मिड्ले रिले | १९७८ | — | जपान | ३:५६.९७ |
| स्प्रिंगबोर्ड डाइव्हिंग | १९७८ | कुओ-त्सन वु | चीन | ६८७.७८ गुण |
| हायबोर्ड डायव्हिंग | १९७८ | लिड हाँग लिन | चीन | ६२९.२५ गुण |

| स्पर्धा | वर्ष | स्पर्धकाचे नाव | देश | वेळ/गुण |
|---|---|---|---|---|
| **स्त्रियांसाठी :–** | | | | |
| १०० मी. फ्रीस्टाईल | १९७८ | एस. यामाझाकी | जपान | १:३०.३० |
| २०० मी. फ्रीस्टाईल | १९७८ | बी. रचनिवान | थायलंड | २:०९.९८ |
| ४०० मी. फ्रीस्टाईल | १९७८ | एस. ज्युनी | सिंगापूर | ४:३१.३५ |
| १०० मी. ब्रेकस्ट्रोक | १९७८ | एच. असारी | जपान | १:०६.७४ |
| २०० मी. ब्रेकस्ट्रोक | १९७८ | एच. असारी | जपान | २:२३.१२ |
| १०० मी. ब्रेकस्ट्रोक | १९७८ | सी. वतानाबे | जपान | १:१६.०४ |
| २०० मी. ब्रेकस्ट्रोक | १९७८ | सी. वतनाबे | जपान | २:४१.०१ |
| १०० मी. बटरफ्लाय | १९७८ | वाय. हतसुदा | जपान | १:०३.५६ |
| २०० मी. बटरफ्लाय | १९७८ | वाय. हतसुदा | जपान | २:१५.७९ |
| २०० मी. मिड्ले | १९७४ | वाय. निशिगावा | जपान | २:५६.२० |
| ४०० मिड्ले | १९७८ | हिराता मिओ | जपान | ५:०६.३४ |
| ८०० मी. फ्रीस्टाईल | १९७८ | एस. ज्युनी | सिंगापूर | ९:१८.३३ |
| ४x १०० मी. मिडले रिले | १९७८ | — | जपान | ४:२७.१६ |
| ४x १०० मी. फ्रीस्टाईल रिले | १९७८ | — | जपान | ४:०३.५८ |
| स्प्रिंगबोर्ड डायव्हिंग | १९७८ | माय चिन शिन | चीन | ५६२.४९ गुण |
| हायबोर्ड डायव्हिंग | १९७८ | हिसाओ सिया चेन | चीन | ४७७.४२ गुण |

## आशियाई क्रीडास्पर्धांतील दुचाकी स्पर्धेचे उच्चांक

| स्पर्धा | वर्ष | उच्चांक धारकाचे नाव | देश | वेळ/गुण |
|---|---|---|---|---|
| | | | | ता. मि. सें. |
| ८०० मी. सामूहिक प्रारंभ | १९६६ | पी. शुलामोहंदोल | थायलंड | १–०५.२७ |
| १००० मी. वेळ मोजून निर्णित | १९७८ | स्वान-सनली | दक्षिण कोरिया | १–११.१५ |
| १६०० मी. सामूहिक प्रारंभ | १९६६ | के. कृष्णान्स्वान | थायलंड | २–१७.७२ |
| १६०० मी. वेळ मोजून निर्णित (संघ) | १९७० | — | जपान | १–५५.०९ |
| ४००० मी. वैयक्तिक पाठलाग | १९७८ | आय. तोशीयकी | जपान | ५–१७.४३ |
| ४००० मी. सांघिक पाठलाग | १९५१ | — | भारत | ४–२९.६० |
| ४८०० मी. सामूहिक प्रारंभ | १९६६ | पी. शुलामोहंदोल | थायलंड | ७–१०.३१ |
| १०,००० मी. सामूहिक प्रारंभ | १९७० | सी. स्पोन पोन्ग | थायलंड | १७–१३.९० |
| १०० कि. मी. सांघिक निर्णित | १९७० | — | जपान | २–१३–३८.६१ |
| २०० कि. मी. सांघिक प्रारंभ | १९७० | जू ग्यान गें | मलेशिया | ५–१२–०.५० |
| २०० कि. मी. सांघिक सामूहिक प्रारंभ | १९७० | — | कोरिया | १५–४२–३७.८० |
| १००० एम. स्प्रिन्ट | १९७४ | एस. ओकाशिमा | जपान | ११.४७ सेकंद |
| १००० एम. वेळ मोजून निर्णित | १९७४ | एस. ओकाशिमा | जपान | ११.३१ सेकंद |
| १०० एम. | १९५१ | एस. सुगिहारा | जपान | १.२०.२ |
| १८० कि. मी. रस्त्यावरील स्पर्धा ( सामूहिक प्रारंभ ) | १९५१ | किहै टोमिइओका | जपान | ३–२२–२३.५० |
| १५९.२३२ कि. मी. रस्त्यावरील स्पर्धा | १९६२ | टी. जिरापन | थायलंड | ४–५३–२५.८० |
| १८० कि. मी. खुली रस्त्यावरील स्पर्धा | १९६२ | — | इंडोनेशिया | १७–५७–४४.४ |

# ॲथलेटिक्समधील अस्पष्ट आशा

**ताजा कलम :** कोणत्याही आंतरराष्ट्रीय क्रीडास्पर्धांत एकुणात मोठे यश मिळवावयाचे तर पुरुषांच्या व स्त्रियांच्याही ॲथलेटिक्समध्ये पदके वेचावी लागतात, श्रावणात प्राजक्ताची फुले वेचल्यासारखी ! नवव्या आशियाई क्रीडास्पर्धांत भारतास तसे काही जमेलशी लक्षणे नाहीत. भारताचा पुरुषांचा व महिलांचा ॲथलेटिक्स संघ जाहीर झाला आहे. त्यांतील प्रत्येक खेळाडूचे आजवेरीचे सर्वोत्तम पराक्रम व आठव्या आशियाई स्पर्धांत त्या त्या क्रीडाप्रकारात, बाबीत पहिले आलेल्यांचे पराक्रम यांची तुलना करता, भारतास फक्त नऊ बाबींतच मात्र काही आशा करण्यास थोडाफार वाव दिसतो. त्या नऊ बाबी म्हणजे पुरुषांच्या ८०० मीटर्स, १५०० मी., ५००० मी. व १०००० मी. या चार पळण्याच्या शर्यती आणि गोळाफेक व स्त्रियांच्या १०० मी., २०० मी. व ४०० मी. या पळण्याच्या शर्यती व ४०० मीटर्स हर्डल्स या होत. या नऊ बाबींत इतर राष्ट्रांतील खेळाडूंनी गेल्या चार वर्षांत प्रगती केलीच असेल. त्यामुळे भारताच्या ॲथलेटिक्समधील आशा आणखीच अधर, अधिक अस्पष्ट, धूसर होतात.

नवव्या आशियाई क्रीडास्पर्धांतील ॲथलेटिक्समधील प्रत्येक बाबीतील भारताचा क्रमांक एकचा खेळाडू, त्याचा आजवेरीचा सर्वोत्तम पराक्रम व कंसात, त्या बाबीत १९७८ च्या, आठव्या आशियाई क्रीडास्पर्धांत प्रथम आलेल्याचा त्या वेळीचा पराक्रम पुढे दिला आहे :-

**पुरुष :—**

धावणे :–१०० मीटर्स–आनंद शेट्टी: १०·७ सेकंद; ( १०·४४ से ); २०० मी–आनंद शेट्टी व टी. सुंदर राज: ( दोघेही ) २१·५ से. ( २१·४२ से ); ४०० मी–के. के. प्रेमचंद्रन् : ४७ से. ( ४६·७१ से. ); ८०० मी–चार्ल्स बोरोमिओ : १ मिनिट ४७·८ से. ( १ मि. ४८·८ से. ); १५०० मी–टी. सुरेश यादव : ३ मि. ४६·९ से. ( ३ मि. ४७·५ से. ); ५,००० मी.–राजकुमार : १३ मि. ४६·५ से. (१४ मि. २२ से. ); १०,००० मीटर्स–शिवनाथ सिंग : २९ मि. २६·४ से. ( ३० मि ७·०७ से. ) आणि मॅरेथॉन–सरूपसिंग–२ तास३० मि. ९ से. ( २ तास १५ मि. २९·७ से ). ११० मीटर्स हर्डल्स–सत्वरसिंग–१४·३ से. ( १४·२८ से. ) व ४०० मीटर्स हर्डल्स–के. एस. बालसुब्रमणि : ५१·९ से. ( ५०·८१ से ); ३००० मीटर्स अडथळ्याची

शर्यत–प्रदीप डोग्रा : ८ मि. ४७·५ से. ( ८ मि. ४०·७ से. ); लांब उडी–एस. बाल-सुब्रमण्यम–७·२६ मीटर्स ( ७·८५ मीटर्स ); काठीने उडी ( पोल व्हॉल्ट )–राजेन्द्र कुमार : ४·६० मीटर्स ( ५·१० मीटर्स ); तिहेरी उडी ( हॉप, स्टेप अँड जंप )–एस. बालसुब्रमण्यम् : १५·८९ मीटर्स ( १६·५६ मीटर्स ); भालाफेक–गुरुतेजसिंग : ७१·४० मीटर्स ( ७९·२४ मी. ); गोळाफेक–बहादूरसिंग : १७·८७ मी. ( १७·६१ मी ); थाळीफेक–अजमेरसिंग : ५२·५० मी. ( ५६·२६ मी. ); हातोडाफेक–सुखवंतसिंग : ६४·२० मीटर्स ( ६८·२६ मी. ); दशप्रकार ( डेकॅथॉन )–जे. पी. सिंग : ६५८४ गुण ( ७,००३ ); २० किलोमीटर्स चालणे–चांदराम : १ तास ४० मिनिटे ०·५ सेकंद ( १ तास ३१ मि. ५४·९ से. )

**स्त्रिया :–**

धावणे :– १०० मीटर्स–पी. टी. उषा : ११·९ सेकंद ( १२·२० से ); २०० मीटर्स–पी. टी. उषा : २४·४८ से. ( २४·८१ से ); ४०० मीटर्स–पद्मिनी थॉमस : ५४·९ से. ( ५५·०९ से. ); ८०० मीटर्स–गीता झुत्सी : २ मि. १०·९ से. ( २ मि. ७·७ से. ); १५०० मी–गीता झुत्सी : ४ मि. २९·८ से ( ४ मि. १८·९ से. ) आणि ३००० मी.–शशिकला रामचंद्रन् : ९ मि. ५९·६ से. ( ९ मि. २४·७ से. ) १०० मीटर्स हर्डल्स–के. अल्फोन्सा १४·७ से. ( १३·९५ से. ); ४०० मीटर्स हर्डल्स–एम. डी. वल्समा : ५९·६ से. ( १ मि. १·३२ से ); लांब उडी–मर्सी मॅथ्यू : ६·०४ मीटर्स ( ६·२८ मी ); गोळाफेक–बख्तवार खंबाटा : १४·५८ ( १७·७० मी. ); थाळी फेक–तयाब–उल निशा । ४१·६६ मी. ( ५५·९२ मी. ); भालाफेक–रझिया शेख : ४३·४४ मी ( ५७·२२ मी ).

* * *

# आभार

चि. राजीव बूलचंद याचे. कोणा अधिकृत वा अन्य क्रीडासंघटनेने निदान १९८२ च्या ऑगस्टपर्यंत म्हणजे नवव्या आशियाई क्रीडास्पर्धांना तीनच महिने बाकी असताही केले नाही ते एक काम या १५ वर्षे वयाच्या शाळकरी मुलाने केले. "दिल्ली पब्लिक स्कूल"मधील या विद्यार्थ्याने आधीच्या आठ आशियाई क्रीडास्पर्धांतील सर्व क्रीडाप्रकारांचे निकाल (प्रत्येकातील पहिल्या तिघांच्या पराक्रमांसह) नीट, एकत्र लिहून ठेविले. माझ्या या पुस्तकाच्या कामासाठी राजीवने ती हस्तलिखित पोथी मला तत्परतेने दिली.

–चि. राहुल गोखले याचे. राजीव बूलचंदच्या त्या पोथीवरून पहिल्या आठ आशियाई क्रीडास्पर्धांत कोणत्या राष्ट्राने किती पदके मिळविली हे दर्शविणारी परिशिष्टे करण्यात माझा पुतण्या राहुल यान बहुमोल साहाय्य केले.

–"कै. महामहोपाध्याय द. वा. पोतदार ग्रंथसंग्रह" या संस्थेचे. "भारत ऑलिंपिक मंडळ" या संघटनेच्या १९२० मधील स्थापनेची माहिती त्या संग्रहात मिळाली.

–श्री. बाबूराव निमल यांचे. बर्लिन ऑलिंपिक्समधील विजेत्या भारतीय हॉकी संघाच्या व त्यातील खेळाडूंना मिळालेल्या प्रशस्तिपत्रकाच्या छायाचित्रांसाठी.

–श्री. बी. एन. अहुजा व "रूपा पब्लिकेशन्स" यांचे. त्यांच्या पुस्तकांतील काही उपयुक्त संदर्भांसाठी.

–आनंद मुद्रणालयाचे श्री. दादासाहेब जोशी व श्री. माधवराव जोशी या बंधुद्वयाचे– सुबक मुद्रणाबद्दल.

–श्री. यशवंतराव धायगुडे यांचे कच्ची मुद्रिते अचूक तपासल्याबद्दल.

–प्र. शं. गोखले

---

चुकीची दुरुस्ती : पान ५७ वर पहिला मथळा "तिसऱ्या आशियाई क्रीडास्पर्धा (मॅनिला, १९५४)" असा आहे. त्याऐवजी तो मथळा "तिसऱ्या आशियाई क्रीडास्पर्धा (टोकिओ, १९५८)" असा वाचावा.



प्रभाकर शंकर गोखले, सव्यसाची पत्रकार. मराठी वृत्तपत्रांतून क्रीडा-वार्ता लिहिण्यापासून प्रारंभ करून नंतर काही पत्रांत सहसंपादक. १९५७ ते ६० "इंडियन एक्सप्रेस"चे पुण्यातील क्रीडा-प्रतिनिधी असता भारतीय खेळांना त्या इंग्रजी वृत्तपत्रांत नियमित स्थान मिळवून दिले. १९६० ते जून १९७० "इंडियन एक्सप्रेस" वृत्तपत्र गटाचे पुण्यातील वार्ताहर. जून १९७० ते जानेवारी १९८० दैनिक "लोकसत्ता"चे भारताच्या राजधानीतील खास प्रतिनिधी म्हणून राजकीय, आर्थिक, शास्त्रीय व आंतरराष्ट्रीय राजकीय व आर्थिक विषयांवर नियमित सटीप लिखाण. जानेवारी १९८० ते एप्रिल १९८१ दैनिक "नवशक्ती"चे प्रधान संपादक. त्यानंतर इंग्रजी व मराठी दैनिकांतून व नियतकालिकांतून स्फुट लिखाण.

● ● ●